

भवानि त्वां वंदे भवमहिषी सत्चितसुख वपू: पराकारां देवीममृतलहरीमैंदवकलाम |

महाकालातितां कलितसरणी कल्पिततनुं सुधासिंधोरन्तर्वसतिमनिशं वासरमयीम् ||

## ग्रंथाचे प्रयोजन

ग्रंथा चे लेखन करित असताना लेखकाचे काही विशिष्ठ ध्येय असते आणि त्या ध्येयाच्या पुर्ततेसाठी ग्रंथातील विषय , उपाय ह्याबद्दल विवरण दिले असते. मायावादाचे जनक भगवान श्री शङ्कराचार्यांचे परमगुरु आणि अजातवादाचे प्रवर्तक परमकरुणामयी अनुग्रह- निग्रहकर्ता आचार्य श्री गौडपादाचार्य ह्यांचे ग्रंथ लिखाण करित असताना केवळ एकच प्रयोजन असु शकते ते म्हणजे अद्वैत वादाचे प्रतिपादन होय. अद्वैत जाणून घेण्यासाठी त्याचे ज्ञान आवश्यक असते आणि ज्ञानप्राप्ति साठी श्रवण मनन आणि चिंतनाचि आवश्यकता असते. सर्वप्रथम वेदांतमूलक ग्रंथांचे विवेचन गुरुमुखातून ऐकायला मिळाले पाहिजे मग त्यावर स्वबुद्धिने विचार व चिंतन व्हायला हवे तेव्हा कुठे साधकाला आत्मा आणि ब्रह्म ह्यामधील साम्य लक्षात येते अर्थात हा बोध अथवा ज्ञान परोक्ष नसून अपरोक्ष असावे कारण केवळ शाब्दिक ज्ञानाचा उपयोग शून्य होय.ते तर परोक्ष ज्ञान होय , नुसते अहं ब्रह्मास्मि म्हटल्याने कोणी ब्रह्म होत नसतो उदा. ऐकून साखरेची गोडी कळत नाही तर त्याचा अनुभव असावा लागतो.
साधकाला स्वानुभुति वर आधारित अपरोक्ष ज्ञान जेव्हा होते तेव्हा महावाक्यांचा अर्थ समजु लागतो. अपरोक्ष ज्ञानप्राप्ति साठी निदिध्यासन म्हणजे चिंतनाची आवश्यकता असते आणि जेव्हा अपरोक्ष ज्ञानाचा उदय होतो तेव्हा साधकाला अहं ब्रह्मास्मि चा अनुभव येतो आणि हिच वास्तविक अद्वैतप्राप्ति होय.
अश्याप्रकारे साधनेद्वारा जीव आणि ब्रह्म यातील भेद मिटून अद्वैतसिद्धि होते. साधनेशिवाय ज्ञानाची अभिव्यक्ति झाली नसेल तर ते ज्ञान भार भूत होय आणि अश्या व्यक्तिला ग्रंथानी लाद्लेल्या गाढवाची उपमा दिली जाते.
आतापर्यंत आपण पाहिले की अपरोक्ष ज्ञानासाठी श्रवण , मनन आणि चिंतनाची अत्यंत आवश्यकता आहे व ह्यासाठी साधक साधन चतुष्ठय संपन्न असायला हवा. ब्रह्म हे सत्य आहे आणि त्याव्यतिरिक्त सकल ब्रह्माण्ड अनित्य किंवा असत्य असा विवेक जागृत होणे हि पहिली पायरी आहे. विवेकाची प्राप्ति श्रवन आणि मननाने होते व असा विवेक जागृत झाला की वैराग्याचा उदय होतो आणि कर्मफ़ळाची आसक्ति क्षीण होउ लागते आणि
शम ,दम याद्वारा उपरति होते व त्यानंतर तितिक्षेचा उदय होतो व साधक साधन चतुष्ठय संपन्न होतो आणि चित्ताचि एकाग्रता वाढु लागते व त्याद्वारे श्रद्धा आणि मुमुक्षत्वाची प्राप्ती होतेअश्या प्रकारे संपन्न झालेला साधक वेदांत श्रवणाचा व अभ्यासाचा अधिकारी होतो आणि मग मोक्षाची इच्छा घेउन परम करुणामयी अहेतुक दयासागर अनुग्रह- निग्रहकर्ता अश्या गुरुला शरण जातो आणि गुरु अश्या गुणसंपन्न साधकाला अध्यारोप आणि अपवाद पद्धतीने ब्रह्म ज्ञान करवतात.सदर अध्यारोप आणि अपवाद विधीचा उपनिषदांमधे उल्लेख आहे.गुरुआपल्या शिष्याला सांगतात की हे सर्व जग म्हणजेच ब्रह्म होय आणि अश्यारीतीने निष्प्रपंच ब्रह्मावर जगताचे आरोपण करून मग हळु हळु नेती नेती म्हणजेच अपवाद रीतीने आरोपित वस्तुंचे निराकरण करीत सरतेशेवटि "ब्रह्म सत्यं जगन मिथ्या" ह्या उक्तिचा अनुभव करून देतात.
येथपर्यंत आपण असे पाहिले की अद्वैताच्या वास्तविक स्वरुपाचे ज्ञान होण्यासाठी एकाग्र अश्या चित्ताची आवश्यकता असते म्हणजे एकाप्रकारे आपण असे म्हणु शकतो की एकाग्र चित्त ही अशी जमीन आहे जिच्यावर अद्वैताच्या ज्ञानाचा महाल उभा करावयाचा आहे.एकाग्र चित्त होण्यासाठी योगाची गरज असते. "योग" काय आहे ?

योगश्चित्तवृत्तिनिरोधः

भगवति कुंडलिनी शक्तीच्या जागरणानंतर वास्तविक योगाची सुरुवात होते. म्हणजेच भगवती कुंडलिनी शक्ति जागरण ही अद्वैत जाणन्याचि पहिली पायरी होय आणि यासाठीच परम करुणामय भगवान श्री गौडपादाचार्य यांनी संसारी मानवाला मोक्ष प्राप्ति व्हावी या उद्देशाने सदर ग्रंथाची रचना केली आणि

त्याचबरोबर बाह्य कर्मकांडाचे खंडन करून मनातून सद्भावना ठेवून केलेल्या अंतर्यागाचा पुरस्कार केला आहे.
ह्याच ध्येयाला अनुसरून श्री गौडपादाचार्य यांनी " श्री विद्या रत्न सूत्र " व " दुर्गा सप्तशती भाष्य " या ग्रंथांची रचना केली याव्यतिरिक्त नरसिंह पूर्वतापनीय उपनिषद भाष्य, उत्तर गीता वृत्ती, सांख्य कारिका आणि मांडुक्य कारिका अश्या अनेक रचनाहि त्यांनी केल्या आहेत. यापैकी मांडुक्य कारिका सोडता इतर ग्रंथ आज दुर्मिळ आहेत. नरसिंह पूर्वतापनीय उपनिषद भाष्य हे मद्रास सरकारच्या ओरिएंटल मॅन्युस्क्रिप्ट लायब्ररीत ५८१ क्रमांकाचा ग्रंथ आहे आणि तो तेलगु लिपिमध्ये संस्कृत भाषेत असून उत्तर गीता वृत्ती हा ग्रंथ वाणी विलास ने छापला आहे.
भगवान श्री गौडपादाचार्य यांच्या संदर्भात एक पुस्तक इंग्रजीत " गौडपाद: अ स्टडी इन अद्वैत " नावाने श्री टि पी एम महादेवन यांनी लिहिले आहे व ते मद्रास विश्वविद्यालय द्वारा प्रकाशित केले या पुस्तकाची द्वितिय आवृत्ती १९५४ मधे प्रकाशित झाली.जिज्ञासू अभ्यसकांसाठी सदर पुस्तक अवलोकनिय आहे.

**१९ व्या श्लोकावरिल विशेष भाष्य ----**

सदर श्लोकात श्रीविद्येच्या पंचदशी मंत्राच्या तीन भागांबद्दल आचार्य लिहितात की
"इति च पंचाक्षर मनुः" या ठिकाणी " इति " हा शब्दाचा संबंध मंत्राच्या चार पांच सहा अक्षरे असलेल्या तीनही कुटांशी आहे ज्यांच्या अंती भुवनेश्वरी बीज आहे.यानंतर " च पंचाक्षर मनु: " असे म्हटले आहे याचे बरेच अर्थ असु शकतात.
याठिकाणी "च" शब्दाचा प्रयोगदोन प्रकारे असु शकतो १) सहित अथवा अधिक २) केवळ पदपूर्ति साठी व इतर अर्थ नसलेला.
पहिला अर्थ घेतला असता पंचदशी मंत्राच्या तीनही कुटांना पंचाक्षर मनु जोडायला हवे, पंचाक्षर मनु ह्याचा अर्थ पांच अक्षरे असलेले मंत्र १) नम: शिवाय २) नम: शिवायै 3) पंच प्रणव. ह्यापैकी नम: शिवाय आणि नम: शिवायै हे सुप्रसिद्ध मंत्र आहेत पंच प्रणव हे पांच बीज मंत्र आहेत ज्यांचा वापर / प्रयोग महाषोडशी मंत्रासोबत केला जातो परंतु या बाबतीत संप्रदाय पुरस्कृत गौप्य बाळगले असल्याने इथे उद्दत करता येणार नाही. तथापि या श्लोकाद्वारे पंचदशी च्या तीन प्रकारांचा ऊहापोह करता येतो. प्रथम प्रकारे पंचदशीच्या शेवटी नम: शिवाय जोडला तर हा मंत्र शिव-शक्त्यात्मक होइल, द्वितिय प्रकारात नम: शिवायै जोडला तर केवळ शक्तीमंत्र होतो आणि तृतीय प्रकारे पंचदशी च्या शेवटी पंच प्रणव जोडून करता येइल परंतु आचार्यांचा संकेत द्वितिय प्रकारच्या जोडणी कडे असावा असे वाटते.
आता इथे प्रश्न असा येतो की येथे पंचाक्षर मनु चा उल्लेख कसा येतो तर यासंबंधी असे म्हणता येइल की ह्याचा संबंध पांच अक्षरी कुटाशी आहे.परंतु प्रत्येक कुट पांच अक्षराचे कसे? माझे परमपूज्य गुरुदेवांनी सौंदर्यलहरी वरील हिंदी टिकेमधे श्लोक क्र. ३२ आणि ३३ वर भाष्य करताना षोडशी विज्ञाना च्या अंतर्गत याचे स्पष्टिकरण केले आहे जिज्ञासु वाचकांनी ते मुद्दाम बघावे. अथवा जर आपण हादि विद्येचा मंत्र पहिला तर त्यात प्रथम कुटामध्ये येत असलेल्या पांच अक्षरांना कमी जास्त केले तर इतर दोन कुटे तयार होतात आणि याप्रकारे संपुर्ण मंत्र प्रथम कुटात मोडतात आणि पंचाक्षर मनु तयार होतो.

डॉ. ताराचंद गर्ग

## मंगलाचरण

कर प्रणाम गणेशको धर सरस्वतीका ध्यान |
व्याख्या सुभगोदय पर करुं , होउ सहायक आन ||

ॐ नमो ब्रह्मादिभ्यो ब्रह्मविद्या संप्रदाय कर्तुभ्यो वंश
ऋषिभ्यो महद्भ्यो नमो गुरुभ्य: सर्वोपल्लवरहित:
प्रज्ञानधन: प्रत्यगर्थो ब्रह्मैवाहमस्मि|

नारायणं पद्मभवं वसिष्ठं शक्तिंच तत्पुत्र पराशरं च ।
व्यासं शुकं गौडपदं महान्तं गोविन्दयोगीन्द्रमथास्य शिष्यम् ॥

श्री शंकराचार्यमथास्य पद्मपादं च हस्तामलकं च शिष्यम् ।
तं त्रोटकं वार्त्तिककारम् अन्यान् अस्मद् गुरून् सन्ततम् आनतोऽस्मि ॥
श्रुतिस्मृति पुराणानाम् आलयं करुणालयं। नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम्॥
शंकरं शंकराचार्यं केशवं बादरायणम्। सूत्रभाष्य कृतौ वन्दे भगवन्तौ पुनः पुनः॥
ईश्वरो गुरुरात्मेति मूर्तिभेदविभागिने। व्योमवद् व्याप्तदेहाय दक्षिणामूर्तये नमः॥
सुषुम्नायै कुंडलिन्यै सुधायै चंद्रमंडलात |मनोन्मन्यै नमस्तुभ्यं महाशक्त्यै चिदात्मने ||
ॐ नमस्ते परमं ब्रह्म कुंडलिनी स्वरुपिणी |निर्गुणाय नमस्तुभं सद्रुपाय नमो नाम: ||
शक्तिपात सुप्रवीणं आचार्यं करुणालयं |योगींद्र सेवकप्रियं भक्तगणैर्सुसेवितं ||
यस्य प्रसादात् शक्ति: शिवेन सह मोदते |वंदे गुरुं गंगाधरं शिवं ज्ञानमयं सदा ||
वंदे तीर्थं नारायणं योगकला प्रदातारं |सकल क्लेशहरणं सर्वं सौभाग्यदातारं ||
नमामि पुरुषोत्तम शंकरं शंकराचार्यं |वाराणसी सुशोभितं भक्त कल्याण संलग्नं ||
वंदेहं श्री योगनंदं गंगातीर निवसिनं |शक्तिपात सुप्रवीणं आचार्य विज्ञानघनं ||
देवास: यस्य निवासः नतोहं श्री विष्णुतीर्थं |सद्गुरुं शिवस्वरुपं शिष्यशक्ति प्रबोधकं ||
प्रणम्यांमहं आचार्य सेवकवृंद सेवितं |श्री पितांबरा पीठस्थ स्वामि: शंकर रूपीणं ||
कामेश्वरि कामेश्वरं श्वेत शोणित चरणं |पुजयामि पुन: पुन: चंद्रमौलीश्वरं हरं ||
भजामि वायुपुत्राय श्री सीताराम सेवकं |राक्षसादि संहारकं भक्तानां अभयकरं ||
श्रीरामाय स्मराम्यहम श्री जानकी सहिताय |भरत शत्रुसूदन लक्ष्मण सुपूजितं ||

**श्री गुरुवे नमः**

## सुभगोदय स्तुती:

**भवानि त्वां वंदे भवमहिषी सत्चितसुख वपू: पराकारां देवीममृतलहरीमैंदवकलाम |**

**महाकालातितां कलितसरणी कल्पिततनुं सुधासिंधोरन्तर्वसतिमनिशं वासरमयीम् ||१||**

**सरळ अर्थ :-** हे भवानि , भगवान शंकर प्रियवल्लभा , सच्चिदानंद रूपा , पराकारा देवी , अमृतलहरी , चंद्रकला व महाकालालाही पादाक्रांत करणारी, कलितसरणी कल्पिततनुं म्हणजेच दिव्य प्रकाश किरणांनी सजलेली अशी, सतत अमृतसरोवरात (अंधाररहित) वास असलेली म्हणजेच द्युतिमान अश्या भगवती कुंडलिनीस मी प्रणाम करतो.

**व्याख्या:-** सुभगोदय स्तुतीचा पहिला श्लोक हा मंगलाचरणाचा असून त्यांत भगवती कुंडलिनीची स्तुति केली आहे. भवानि ही कुंडलिनी शक्तिच असून( ललितासहस्त्र नामातील ११० वे नाव ) श्री भगवती राजराजेश्वरी, श्री महात्रिपुरसुंदरी ह्या पदानेही भवानि ओळखली जाते अर्थात हे सर्व एकच आहे.
**भव** = अनेकार्थ वाचक शब्द असुन **अन्** = जीवन किंवा स्पंदित करणारी , चलनवलनाची आद्य शक्ति होय.
भव = भगवान शंकर

**शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुं**
**न चेदेवं देवो न खलु कुशलः स्पंदितुमपी।** --- सौंदर्यलहरी

शक्ति शिवाय शिव हा शव म्हणजेच स्पंदरहित आहे . शिव शब्दातून “ ई “ कार (ई कार रूपी शक्ति) वजा केला असता शव हा शब्द उरतो अर्थात शक्ति हीच भगवान शंकराची जीवनदात्री आहे.ह्या शक्तीच्या योगानेच भगवान शंकर हे विश्वरचनादी कार्य करू शकतात. निष्क्रिय ब्रह्म हे स्पंदरहित आहे अर्थात स्पंदकारक अश्या शक्तीच्या योगानेच सगळी कार्ये संपन्न होतात.
भगवती ला ललितासहस्त्र नामातील ३७३ वे नाव – कामेश्वरप्राणनाडी ह्या नावाने संबोधिले जाते. भगवती ही भगवान शंकराला प्राण दात्री आहे, भगवती अमृतरूपा असल्याने हलाहला सारखे महाविष प्राशन करूनही शंकर भगवान मृत्यूपासून वाचले आहेत.

भगवत्पाद शंकराचार्य सौंदर्यलहरीत विशद करतात की

**किरन्ती-मङ्गेभ्यः किरण-निकुरुम्बमृतरसं हृदि त्वा माधत्ते हिमकरशिला-मूर्तिमिव यः ।**
**स सर्पाणां दर्पं शमयति शकुन्तधिप इव ज्वरप्लुष्टान् दृष्ट्या सुखयति सुधाधारसिरया ॥ 20 ॥**
**सुधामप्यास्वाद्य प्रति-भय-जरमृत्यु-हरिणीं विपद्यन्ते विश्वे विधि-शतमखाद्या दिविषदः ।**
**करालं यत् क्ष्वेलं कबलितवतः कालकलना न शम्भोस्तन्मूलं तव जननि ताटङ्क महिमा ॥ 28 ॥**

अर्थात भगवती ही भगवान शंकराला जीवन देणारी म्हणून भवानी ह्या संज्ञेनी संबोधिली जाते.

भव = संसार (विश्व) -- ही पराशक्ति विश्वाला जीवन देते , स्पंदीत करते म्हणून भवानी ह्या संज्ञेनी संबोधिली जाते, भगवती ही प्राणशक्ति आहे आणि विश्वातिल सर्व कार्ये त्यामुळेच सुरू होतात / चालू रहातात.ही पराशक्ती जगताच्या उदयाला कारणीभूत आहे , संपूर्ण जगताला धारण करते. ब्रह्मा विष्णु आणि महेश आपल्या शक्तिपासून विलग झाले तर विश्वाची सगळी कामे थांबतील.

ही पराशक्ती विश्वजननी होय , कोटी कोटी ब्रह्मांडाची जन्मदात्री आहे , जसे बाळाला आपल्या मातेपासून जीवनधारा प्राप्त होते त्याप्रमाणेच संपूर्ण ब्रह्मांडाला भगवती पासून जीवन मिळत असते.

**श्री गोस्वामी तुलसीदास म्हणतात**
**भव भव विभव पराभव कारिनी --- जगत जननी दामिनी दूति गाता**

तसेच श्रुतींच्या प्रमाणे

**अदि॑ति॒र्द्यौरदि॑तिर॒न्तरि॑क्ष॒मदि॑तिर्मा॒ता स पि॒ता स पु॒त्रः ॥**
**विश्वे॑ दे॒वा अदि॑तिः॒ पञ्च॒ जना॒ अदि॑तिर्जा॒तमदि॑ति॒र्जनि॑त्वम् ॥ १० ॥** ऋग्वेद १/१/८६

दीङ् (क्षये) + क्तिन् (कर्तरि) = अ+दिति = आदिति = अक्षयभूता , अखंडिता = पराशक्ती

**एष सर्वेश्वर एष सर्वज्ञ एषो अंतर्याम्येष**
**योनिः सर्वस्य प्रभवाप्यौ हि भूतानाम** | ---- मांडूक्योपनिषत

**हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेकासीत ।**
**स दाधार पृथ्वीं ध्यामुतेमां कस्मै देवायहविषा विधेम ॥1॥**
**यः प्राणतो निमिषतो महित्वैक इद्राजा जगतो बभूव ।**
**य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषाविधेम ॥3॥** - प्रजापती सूक्त – ऋग्वेद ०८/१०/१२१

**भव = कामदेव** - हर नेत्राग्नि संदग्ध काम संजीवनौषधिः (ललितासहस्त्र नामातील ८४ वे नाव )
कामदेवाला आपल्या तृतीय नेत्राने शिवाने भस्म केले असता माता भगवतीच्या कृपेने परत जीवन प्राप्त झाले याचाच अर्थ अमृतरूपा असल्याने भगवतीला मृत प्राण्यांना सुद्धा जीवनदान देण्याचे सामर्थ्य आहे. तिला अमृतलहरी असेही नामाभिधान प्राप्त आहे. आणि म्हणूनच तिचे भवानी नाव सार्थ आहे.
तसेच - बाला मंत्राच्या कामबीजातिल शक्ति ( ई ) हि कामबीजाला जीवन देणारी आहे.
तसेच - कामदेव श्री विद्येच्या उपासने द्वारा आपल्या विश्वमोहक स्वरुपात विद्यमान आहे.
तसेच – भवानी हे भगवतीच्या स्वरूपाचे नाव असून ती स्थानेश्वराची अधिष्ठात्री देवी आहे.

**स्थानेश्वरी भवानी तु बिल्वके बिल्व पत्रिका --- (देवी भागवत पुराण ७/३०/६१)**

**भवमहिषी** – शंकराची पट्टराणी अथवा भव = संसार – संसाराची सम्राज्ञी (ललितासहस्त्र नामातील २ रे नाव) श्री महाराज्ञी , चराचर जगन्नाथा (ललितासहस्त्र नामातील २४४ वे नाव)
श्री माता पराशक्ती भगवती ही जगन्नायिका आहे , सकल ब्रह्मांडाला धारण करणारी म्हणजेच धात्री आहे ब्रह्मा विष्णु आणि महेश ह्यांच्या रूपाने सकल ब्रह्मांडाचे सृजन , पालनपोषण व संहार करणारी आहे.
श्री गोस्वामी तुलसीदासांनी आपल्या रामचरित मानसात म्हटले आहे की

**उद्भवस्थितिसंहारकारिणीं क्लेशहारिणीम्।**
**अजा अनादि सक्ति अबिनासिनि। सदा संभु अरधंग निवासिनि॥**
**जग संभव पालन लय कारिनि। निज इच्छा लीला बपु धारिनि॥**
**जगदंबिका जानि भव भामा। सुरन्ह मनहिं मन कीन्ह प्रनामा॥ - बाल कांड**

भगवती परशक्ती ही सकल ब्रह्मांडाची संचालिका आणि नियंत्रण करणारी असल्याने विश्वाची महासम्राज्ञी आहे.आधी सांगितल्याप्रमाणे मांडूक्योपनिषत तसेच ऋग्वेदातिल वचनांनीही तसे स्पष्ट होते.

भगवतगीतेत भगवान कृष्ण म्हणतात की

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोङ्कार ऋक्साम यजुरेव च ॥ ९-१७ ॥**
**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ ९-१८ ॥**
**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥ १८-६१ ॥**

तंत्र शास्त्रातिल रात्रीसुक्तात सुद्धा माता भगवतीला विश्वेश्वरी असे म्हटले गेले आहे.

**सतचित्सुखवपु** – भगवती ही सच्चिदानंद स्वरुप असलेली अशी आहे. श्रुती स्मृती पुराणे आगमनिगमादि शास्त्रे एका स्वरात ह्या पराशक्तीला सच्चिदानंद स्वरूपिणी म्हणतात. हा सच्चिदानंद शब्द सत , चित आणि आनंद अशा तीन शब्दांनी मिळून बनलेला आहे म्हणजेच सत चित आणि सुख तसेच वपु म्हणजे शरीर किंवा रूप.

देवी भागवतात स्कंद ४ अध्याय १५ असे विषद केले आहे की

**महाकुंडलिनी रुपे सच्चिदानंद रुपिणी प्राणाग्नी होत्र विद्ये ते नमो दीपशिखात्मने** ||

भगवती पराशक्ती ही अपरिवर्तनशील आहे, देश काळ आणि परिस्थिति ह्यांच्यामुळे कुठलाही प्रभाव तिच्यावर पडत नाही.
कुठलेही परिवर्तन हे केवळ मायेच्या प्रभावामुळे भासत असते, ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ह्या महावाक्यावर तर संपूर्ण शांकर अद्वैत सिद्धान्त अवलंबून आहे. ही पराशक्ती सदैव एकमात्र सत्यस्वरुपात विद्यमान असते, केवळ हीच परात्पर शक्ति तुलने शिवाय म्हणजेच सापेक्षता रहित आहे,प्रसिद्ध विज्ञानवेत्ते श्री आल्बर्ट आईनस्टाईन ह्यांच्या सापेक्षता सिद्धांतानेही ह्या पराशक्तीच्या एकमेवा द्वितीय स्वरूपाला जोड दिली आहे. ब्रह्मांडात जे काही आहे ते सर्व सापेक्ष आहे परमसत्य हे केवळ एकच असू शकते आणि ते म्हणजे परब्रह्म किंवा परमतत्व किंवा पराशक्ती आणि म्हणूनच भगवती पराशक्ती ही सत्यस्वरूपा आहे.श्रुति सुद्धा हेच सांगतात की

**एकं सद् विप्रा बहुधा वदंती सत्यं ब्रह्म | --** शतपथ ब्राह्मण १४/८/५/१

**सत्यं ज्ञानमनंतम ब्रह्म | यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन |**
**सोश्नुते सर्वान कामान सह ब्रह्मणः विपश्चितेति | --** तैत्तिरीय उप. ब्रह्मानंद वल्ली २

परब्रह्म परमात्मा हा सत्यस्वरूप आहे. हया ठिकाणी सत्य हे विशेषण नित्य सत्तेचा बोध दर्शविणारे असून परब्रह्म हे नित्य सत्य आहे म्हणजेच कोणत्याही काळात ते असतेच, नित्य सत्य किंवा परब्रह्म नाही असा काळ असू शकत नाही कारण काळ हा सापेक्ष असतो आणि परब्रह्म हे केवळ एकमेव आहे आणि त्याचे स्वरूप हे ज्ञान स्वरूप आहे , त्यात अज्ञानाचा लेशमात्रहि नाही, देश काळ ह्यांच्या सीमेपलीकडे तसेच अलिकडेही म्हणजेच सीमा नसलेले असे आहे, परब्रह्म आकाशात असतांनाहि सगळ्या प्राणीमात्राच्या दहराकाशात हृदयगुंफेत सतत वास करीत असते , जो साधक परब्रह्म परमात्म्याला जाणतो , तो सर्वंकष अश्या परब्रह्म परमात्म्या सोबत सगळ्या प्रकारच्या भोगांचा अलौकिक अनुभव घेतो.
भगवतगीतेत भगवान कृष्ण सांगतात की

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ १७-२३ ॥**

परब्रह्म शक्ति हीच परब्रह्म आहे

**ॐ नमस्ते परमं ब्रह्म परब्रह्म स्वरूपिणे |**

**निर्गुणाय नमस्तुभ्यं सद्दपाय नमो नमः ||** महानिर्वाण तंत्र

अमरकोशात (२३ – ८३) सत् चे अनेक अर्थ दिले आहेत –

सत् = विद्यमान – पराशक्ती सर्वत्र आणि सर्वकाळ असते, महाप्रलयानंतर निर्गुण ब्रह्म स्वरुपात असल्याने सत् स्वरूपच आहे.

सत् = अत्युत्तम – भगवती सर्वोत्तम असल्याने सत् स्वरूपच आहे.
सत् = योग्य – पराशक्ती जाणण्या योग्य व पूजनीय आहे.
चित् = बुद्धि , धि , प्रज्ञा , चेतना , संवित् वगैरे (अमरकोष ५ – १)
भगवती पराशक्ती, सर्वव्याप्त अशी चेतना , चेतनशक्ति , चिती शक्ति आहे
ललिता सहस्त्रनामात भगवतीला चिती (३६२), चिदैकरसरुपिणी (३६४), प्रत्यक्चितिरूपा (३६७), चिन्मयी (२५१) चित्शक्तीश्चेतना रूप (४१६ - ४१७) इत्यादि नावांनी स्तुती केली जाते.
तंत्रोक्त रात्रीसुक्तात असे म्हटले आहे की

**त्वं बुद्धिर्बोध लक्षणा**

दुर्गा सप्तशती असे सांगते की

**या देवी सर्वभुतेषु चेतनेत्यभिधीयते । नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ॥७॥**
**या देवी सर्वभुतेषु बुद्धिरूपेण संस्थिता । नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ॥८॥**
**चितिरूपेणया कृत्स्नमेतद्व्याप्य स्थिता जगत् । नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ॥२८॥**

योगशिखोपनिषदात ह्या महाशक्तीला चिदात्मन आणि चित्शक्ती असे संबोधिले आहे.

**सुषुम्नायै कुण्डलीन्यै सुधायै चन्द्रमण्डलात् । मनोन्मन्यै नमस्तुभ्यं महाशक्त्यै चिदात्मने ॥ ३॥**
**ब्रह्मरन्ध्रे महास्थाने वर्तते सततं शिवा । चिच्छक्तिः परमादेवी मध्यमे सुप्रतिष्ठिता ॥ ४७॥**

देवीभागवतात सांगितले आहे की

**चित् शक्ति परमेश्वरस्य विमला चैतन्यमेवोच्यते ||**

माझे पूज्य गुरुदेव श्री स्वामी विष्णुजी तीर्थ विरचित शक्तिपात सूत्रात भगवतीला चितीर्वा असे नामाभिधान आहे. तर यामलात शक्तीला **चित्कला** म्हटले आहे.

**ध्यायेतकुंडलिनीं देवीं स्वयंभूलिंगवेष्टितां |**
**चित्कलां यां कुंडलिनीं तेजोरुपां जगन्मयीं ||**

**आनंद** = सुख – भगवती परादेवी आनंदस्वरूप असते, सगळया आनंदाचा स्त्रोत कुंडलिनी शक्ति आहे.
भगवतीचे रूप हे अत्यंत आनंददायी आहे. श्रुतित असे म्हटले आहे की

**विज्ञानं आनंदं ब्रह्म**:

तैत्तिरीयोपनिषतात भृगुवल्ली मधील ६ व्या अनुवाकात संगितले आहे की

**आनन्दो ब्रह्मेति व्यजानात् । आनन्दाध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ।**
**आनन्देन जातानि जीवन्ति । आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ।**

तात्पर्य – आनंद हेच ब्रह्म आहे असे निश्चयपूर्वक जाणावे, कारण खरोखर आनंदापासूनच जीवसृष्टीची उत्पत्ति होते आणि उत्पत्तिनंतर प्राणिमात्र आनंदात आयष्य घालवुन मृत्युलोकातून प्रयाण केल्यावर आनंद लोकातच प्रवेश करतात. ( अश्याप्रकारे जो समजून वागतो त्याला ब्रह्मज्ञान होते)
तैत्तिरीयोपनिषतातिल ब्रह्मानंद वल्ली च्या सहाव्या अनुवाकात ब्रह्म्याच्या आनंदस्वरूपाचे विवरण आहे.
ललितासहस्त्रानामा मध्ये तर भगवती च्या स्वरूपाला परम आनंदमय " परमानंदमया – (२५२)

**स्वात्मानन्दलवीभूत-ब्रह्माद्यानन्दसन्तत्यै** (३६५)

भगवान श्री शंकराचार्यांनी सौंदर्यलहरी मध्ये भगवतीला परमाल्हाद लहरीं असे म्हटले आहे

**तटिल्लेखा-तन्वीं तपन शशि वैश्वानर मयीं**
**निष्ण्णां षण्णामप्युपरि कमलानां तव कलाम् ।**
**महापद्माटव्यां मृदित-मलमायेन मनसा**
**महान्तः पश्यन्तो दधति परमाह्लाद-लहरीम् ॥ 21 ॥**

सत् चित् आणि आनंद हे समाधी अवस्थेच्या वेगवेगळ्या स्तरांचेहि द्योतक आहेत.

समाधी अवस्थेमध्ये साधकाला आनंदाचा अनुभव सर्वप्रथम येतो. ह्या स्तरावर साधकाची त्रिपुटि (ध्याता, ध्येय आणि ध्यान ) तशीच राहाते आणि ज्ञाता ज्ञान व ज्ञेय विद्यमान असतात. साधकाचा अहं भाव अर्थात कर्तेपणा म्हणजे ज्ञाता , परब्रह्म परमात्मा म्हणजे ज्ञेय आणि आनंदाची अनुभूती हे ज्ञान होय.या अवस्थेत जीव हा परमात्म्यापासून स्वता: वेगळे आहोत असा अनुभव घेतो (द्वैतानुभव). जसे प्रियकर - प्रेयसीला भेटल्याचा आनंद तसेच भक्त आपल्या इष्ट देवतेशी ध्यानात एकरूप झाल्याचा आनंद प्राप्त करतो. या

ठिकाणी आनंदाची अनुभूती येते म्हणजे नक्की काय घडते हा खरा मुद्दा आहे, ही अनुभूती हा मनाचा विषय आहे,साधकाचे मन सुख दु:खाचा अनुभव घेते आनंदाचा अनुभव घेते याचाच अर्थ ह्या स्तरावर मन हे तत्व कार्यरत असते आणि म्हणूनच समाधीच्या ह्या स्तराला **समनि** ( मनासहित ) स्तर म्हणता येईल.

साधक जेव्हा यापुढील स्तरावर पोहोचतो तेव्हा भान (काय घडत आहे त्याची जाणीव ) तर असते परंतु घडत असलेल्या क्रिया / कृती ह्या अवर्णनीय (कार्यकारण भाव उमजत नाही अश्या ) असतात, साधकाला फक्त चेतनेचा ( चेतनाशक्तीचा ) अनुभव येत असतो. या स्तरावर अहं आणि इदं विद्यमान असतात परंतु इदं चे स्पष्ट स्वरूप लक्षात येत नाही कारण ज्ञाता व ज्ञेय उरतात परंतु ज्ञानाचा स्पष्टपणा नसतो, हळूहळू मनाचा लय होत असल्याने म्हणजेच **मनस्तत्वं जित्वा** अशी अवस्था म्हणजेच **उन्मनी** (न मन) अवस्था होय.
यानंतरच्या अवस्थेत साधक – साध्य , ज्ञाता – ज्ञेय , अहं – इदं हा भेद नष्ट होतो (द्वैत संपते) आणि परम अद्वैताचा उदय होतो. अशी अवस्था प्राप्त करणे हे साधनेचे अंतिम लक्ष्य होय. हेच वास्तविक वेदांताचे ज्ञान होणे आहे, इथे साधक आणि परब्रह्म एकरूप होतात आणि साधकाला “अहं ब्रह्मास्मि “ ह्या स्थितीचा अनुभव होतो. चारही महावाक्यांचा ( चार महावाक्ये - **प्रज्ञानं ब्रह्म: , अयमात्मा ब्रह्म: , तत्वमसी , अहं ब्रह्मास्मि** ) अर्थ समजू लागतो. ह्या अवस्थेचे साधक वर्णन करू शकत नाही कारण द्रष्टा व दृश्य हे वेगळे नसतात. म्हणून असे म्हणतात जसे मुका माणूस गुळाच्या गोडीचे वर्णन करू शकत नाही तशी अवस्था साधकाची होते.
परमहंस भगवान श्री रामकृष्ण देव उदाहरण देतात की समजा मिठाची प्रतिमा समुद्रात सोडली तर काय होईल ?
ती परत येऊन काही सांगू शकेल काय ? ती तर त्यातच विलीन झाली !
या अवस्थेच्या आधीच्या स्तरावर साधक आनंदाचा अनुभव घेतो म्हणूनच असे आहे की निर्गुण अवस्था नीरस (रसहीन) आणि सगुण अवस्था ही रससहित / सरस असते.
वर वर्णन केलेली अवस्था ही निर्विकल्प समाधी अवस्था होय या अवस्थेत ( स्तरावर काय घडते ) काय होते ते काहीही कळत नाही.
क्रमानुसार या तीनही स्तरांना मंत्रात्मक असे संबोधिले जाते की
१ – सत्चिदानंद ब्रह्म
२ – सत्चितएकं ब्रह्म
३ – सत्यं ब्रह्म
हे मंत्र प्रत्यक्षात संप्रदायानुसार बदलू शकतात.
भगवान श्रीकृष्ण भगवतगीतेत सांगतात की

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः । ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ १७-२३ ॥**
**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः । प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ १७-२४ ॥**
**तदित्यनभिसन्धाय फलं यज्ञतपःक्रियाः । दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः ॥ १७-२५ ॥**
**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते । प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ १७-२६ ॥**
**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते । कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ १७-२७ ॥**

सत् चित् आणि सुख – या तीन गुणांवर उपासनेचे विविध प्रकार अवलंबून आहेत.
आनंदरूप ब्रह्मा ची उपासना हा कौल मार्गाचा मुख्य आधार होय. कौल मार्गात आनंदाला महत्व असल्याने पंचमकार पद्धत महत्वाची ठरते. मिश्र मार्गामध्ये शक्तीच्या चित् स्वरूपाला महत्त्व आहे तर

समयाचारी शक्तीच्या सत् स्वरूपाला प्राधान्य देतात.भगवती कुंडलिनी जेव्हा आपल्या ऊर्ध्व प्रवास पूर्ण करून सहस्त्रारात पोहोचते तेव्हा साधकाला निर्विकल्प समाधीचा अनुभव येतो याठिकाणी शक्तीचे केवळ सत् स्वरूप कार्यरत असते आणि ही अवस्था प्राप्त करणे हे समयाचार उपासनेचे ध्येय होय.
**पराकारा –** महाशक्तीचा आकार परा असा आहे म्हणजे ती पराशक्ती आहे. देवी भागवताच्या नवव्या स्कंदात भगवतीच्या स्वरूपाचे वर्णन करतांना लिहिले आहे की - **तेज:स्वरूपा पामा तदधिष्ठातृ देवता।**
तंत्रोक्त रात्रीसुक्तात असे म्हटले आहे की - **पराऽपराणां परमा त्वमेव परमेश्वरी ॥१०॥**
काम कला विलास ह्या ग्रंथांनुसार -

**स्फुट शक्ति समागम बिजांकुर-रुपिणी पराशक्ती अनुत्तररूपानुत्तरविमर्शलिपिलक्ष्यविग्रहा भाति ||३||**
**यासांतरोहरूपा परा महेशी त्रिभाविताकारा स्पष्टा पश्यंतादि-त्रिमात्रिकात्मा च चक्रतां याता ||२०||**
**सेयं परामहेशी चक्राकारेण परिणमेत यदा तद्देहावयवानां परिणतीरावरणदेवता: सर्वा: ||३६||**

माझे परमपूज्य गुरुदेव आपल्या शक्तिपात सूत्रात लिहितात की

**उन्निद्रिता विशुद्धे तिष्ठती मुक्ति रूपा पराशक्ती ||** - पाद ४,3

श्र्वेताश्र्वेतर उपनिषद सांगते की
**तमोश्वराणां परमं महेश्वरं तं देवतानां परमं च दैवतं**
**पतिं पतीनां परमं परस्ताद्विदाम देवं भुवनेशमिड्यं ||६-७||**
**न तस्य कार्य करणं च विद्यते न तस्यमाश्चाभ्यधिकश्च दृश्यते |**
**परास्य शक्त्रिविविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञान बल क्रिया च ||६-८||**

**ब्रह्मसूत्र – " परात्तू तच्छूते --- २-३-४१**
**गितेमध्ये भगवान स्वतः सांगतात की**
**" मत्तः परतरं नान्यत " --- अ.७ – ७**

भगवतीच्या परा स्वरूपाबद्दल अधिक महितीसाठी – श्री पंडित श्रीकृष्णदत्त भारव्दाज एम.ए. आचार्य, साहित्यरत्न ह्यांनी लिहिलेला कल्याण मासिकाच्या ऑगस्ट १९४६ च्या पान नं १२६६ ते १२७५ " पर तत्व मीमांसा " हा लेख जरुर वाचावा.
भगवती कुंडलिनी शक्ति वाणीरूपा आहे, शब्दब्रह्मरूपा आहे. वाणीचे चार प्रकार आहेत

१) परा २) पश्यंती ३) मध्यमा आणि ४) वैखरी

ह्यातील परावाणी ही इतर तीनही प्रकारांची जननी आहे आणि म्हणूनच भगवती कुंडलिनी शक्ति ही परावाणी रूपा होय. कामकला स्तव ह्या ग्रंथात असे म्हटले आहे की

**परया पश्यंतापी च मध्यमया स्थूल वर्ण रूपीण्या |**
**एताभिरेक- पंचाशडक्षरात्मिका वैखरी ज्ञातः ||३२||**

आचार्य श्री भास्कर राय ललितासहस्त्रानामाची व्याख्या करतांना परा ह्याचा ( ल.नाम ३६६ - परायै ) अर्थ पराशक्तीच्या वाणी रूपा बद्दल वरीलप्रमाणेच सांगतात.
त्रिपुरा सिद्धांतानुसार परमानंद नाथ ह्यांचावर प्रसन्न झाल्यामुळेही भगवती परा ह्या नामाभिदानामुळे प्रसिद्ध आहे किंवा परमानंद नाथांवर कृपेचे कारण असल्यानेही तिला परा म्हटले जाते.
त्रिगुणतीत आणि कालातीत आहे म्हणूनही तिला परा म्हटले जाते.
पर ह्या शब्दाचा अर्थ उत्तम असाही होतो ( अमर कोष २३/१९१ )
भगवती श्री विद्या ही सर्वोत्तम आहे , साधनेचा सर्वोत्तम मार्ग आहे, सर्वोत्तम अशी फलदायिनी आहे.
श्री विद्या मोक्षदायिनी आहे म्हणूनच परा विद्या आहे.
ललितासहस्त्रनामात भगवतीला परा-शक्ति (५७२) म्हटले आहे.
अमृत-लहरिं - भगवती कुंडलिनी शक्ति अमृताचा स्त्रोत आहे , अमृत रूपा आहे ,ब्रह्म अमृत स्वरूपा आहे.
श्रुति सांगते की –
**मृत्योर्मा अमृतगमय , उतामृतत्वस्येशानो , यत्ज्योतिरन्तरमृतं , यस्यत्छायामृतं |**

संपूर्ण ऋचा येणेप्रमाणे आहेत –

**पुरुष एवेदँ सर्व यद्भुत यच्च भाव्यम् |**
**उतामृतत्वस्येशानो यदन्न्येनातिरोहतिं ||२||** शु. य. पुरुषसूक्त ३१-२
**यत्प्रज्ञानमुत चेतो धृतिश्च यज्ज्योतिरन्तर मृतं प्रजासु |**
**यस्मान्न ऋते किञ्चन कर्म क्रियते तन्मे मनः शिव संकल्पमस्तु** ||३|| शु. य.अ. ३४-१९
**य आत्मदा बलदा यस्य विश्व उपासते प्रशिषं यस्य देवाः |**
**यास्यत्छायामृतं यस्य मृत्युः कस्मै देवाय हविषा विधेम ||** ऋग्वेद – प्रजापती सूक्त ८/१०/१२१

ललितासहस्त्रनामात भगवतीला - **सुधाधारा-भिवर्षिणी** (१०९) , **मृत्युमथनी** (१८१) , **सर्वव्याधी प्रशमनी** (५५१)
**सर्वमृत्यु निवारिणी** (५५२) आणि **सुधा सृतीः** (७८९) इत्यादि नावांनी संबोधित केले आहे.
श्वेताश्वतरोपनिषदाच्या सहाव्या अध्यायात असे उद्धृत केले आहे की

**स तन्मयो ह्यमृत ईशसंस्थो ज्ञः सर्वगो भुवनस्यास्य गोप्ता ।**
**य ईशेऽस्य जगतो नित्यमेव नान्यो हेतुर्विद्यत ईशनाय ॥ १७॥**
**निष्कलं निष्क्रियं शान्तं निरवद्यं निरञ्जनम् ।**
**अमृतस्य परं सेतुं दग्धेन्दनमिवानलम् ॥ १९॥**

2) सगळ्या प्राणिमात्रांचे जीवन हे शक्तीमुळेच असते याचाच अर्थ शक्ति ही प्राण आहे अथवा चैतन्य शक्ति असल्याने अमृतस्वरूपा आहे.

3) भगवती कुंडलिनी शक्ति जागृत झाल्यानंतर जेव्हा सूर्य ऊर्ध्वमुख होतो तेव्हा सोममंडलातुन अमृतवर्षा सुरु होते आणि साधकाचे संपूर्ण शरीर त्यात न्हाऊन जाते. जसे म्हटले आहे की

" **सुधाधारासारै स्नापयसि तनु** "

आणि साधक जरा ( वृध्धत्व – म्हातारपण ) , मृत्यु ह्यावर विजय मिळवितो.
ज्ञानेश्वर माउली ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात ह्या अवस्थेचे फार सुंदर असे वर्णन केले आहे.
४) श्री विद्येच्या उपासनेने ( कुंडलिनी साधना) साधक अमरत्व प्राप्त करतो आणि म्हणून भगवती कुंडलिनी शक्ति ही अमृतलहरी आहे.
५) चंद्रमंडलातून अमृत स्त्राव होतो आणि श्री विद्या ही चंद्रविद्या होय आणि म्हणून अमृतलहरी होय.

ऐंदव कला – ऐंदव = इंदु = चंद्र - तत्संबधी ऐंदव कला = कला तू षोडशी भागो (अमरकोष ३-१३)
चंद्रमंडळाच्या सोळाव्या भागाला कला म्हणतात आणि चंद्राची सोळावी कला ही ऐंदव कला होय.
हयाविषयी माझे परमपूज्य गुरुदेव सौंदर्यलहरी वरील आपल्या टीकेत षोडशी विज्ञानावर भाष्य करीत असतांना पान नं १८६ – १८८ सांगतात की
चतुर्थ पाद हे लक्ष्मीचे एकाक्षरी बीज आहे जे गुरुमुखातून फक्त प्राप्त होऊ शकते, आणि त्यालाच चंद्रकला म्हटले जाते. प्रत्यक्षात शेवटचे एकाक्षरी लक्ष्मी बीज हे नित्या (सतत / अविरत / सार्वकालिक) आहे कारण
ती परा कला आहे त्यामुळेही तिला श्री विद्या म्हटले जाते. सोळाव्या कलेत बाकीच्या कलांचा उदय आणि अस्त होतो त्या सोळाव्या कलेच्या अधीन असतात. शुक्ल व कृष्ण पक्षाच्या १४ तिथी, पोर्णिमा व अमावास्या ह्या चंद्राच्या सोळा कला होत. सोळावी कला ही शुद्ध चिती शक्ति (चैतन्य शक्ति), चिन्मात्र, निर्विकल्प समाधीत विराजमान असणारी प्रत्यक्ष महात्रिपुरसुंदरी होय कारण इतर सर्व कला उदयास्त होतात परंतु चंद्राचे बिंब बदलत नाही,तसेच राहते म्हणजे सगळ्या कला ह्या सोळाव्या कलेचा अंशमात्र आहेत.

श्री आचार्य लक्ष्मीधर सौंदर्यलहरी वरील ३२ व्या श्लोकाच्या टीकेत लिहितात की ---

**षोडशी कला नाम शकार – रेफ – ईकार – बिन्वनतो मंत्र;।**
**एतस्येव बीजस्य नाम श्री विद्येति।**
**श्री बीजात्मका विद्या श्री विद्येती रहस्यं।**

चंद्रकलेतून १७ वी कला घेता येते जी अमृतकला होय.
भगवती कुंडलिनी शक्ति वर सांगितल्याप्रमाणे चंद्राची १७ वी कला होय. काम-कला-विलास ह्या ग्रंथाच्या मराठी टीकेमध्ये चंद्रकला ह्याचा अर्थ १७ वी कला असा घेतला आहे.

**आसीनां बिंदुमये चक्रे सा त्रिपुरसुंदरी देवी।**
**कामेश्वराङ्कनिलया कलया चंद्रस्य कल्पितोत्तंसा ॥३७॥**

भगवती कुंडलिनी शक्ति चंद्राच्या १७ व्या कलेचा मुकुट धारण करून अधिकच शोभायमान आहे.
ललितासहस्त्रनामात भगवतीला चंद्र-विद्या (२३९), चंद्र-निभा (५९२) असे संबोधिले आहे.

महाकालातीता – भगवती महाकालाच्याही पलीकडे असते
काल = शंकर , समय , मृत्यू
म्हणजे भगवती भगवान शंकराच्याही पलीकडे ( भगवान शंकराच्या सत्तेच्याही वर असते) असल्याने महाकालातीता होय.

**ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च ईश्वरश्च्य सदाशिवा: |**
**एते पञ्च महाप्रेता: भुतादीपतयो मता: ||१||**
**चत्वारो मंच चरणा पंचम प्रच्छद: पट: |**
**संवितप्रकाश रूपेण शिवेनाभिन्न: विग्रहा ||२||**
**तत्रासने समासीनां निर्भरानंद रुपिणी |** --- यामले

कुंडलिनी शक्ति सहस्त्रारात जातांना आज्ञाचक्रात महाकालाला ओलांडून पुढे जाते म्हणून ती महाकालातीता होय.

**आज्ञा पद्मम भृवोर्मध्ये हक्षोपेत द्विपत्रकम |**
**शुक्लाभं तन्महाकालः सिद्धो देव्यात्र हाकिनी ||** - शिव संहिता ५ वे पटल

किंवा

**शिवतत्वोर्धता: शक्ति: परा सा समनाव्हया |**
**सर्वेषां कारणानां सा कर्तुभूता व्यवस्थित: ||** - तंत्रालोक अष्टम आन्हिक ४००

**नादरूपं भ्रुवोर्मध्ये मनसो मण्डलं विदुः ||१५||**
**शांभवस्थानमेतत्ते वर्णितं पद्मसंभव ||१६||** -- योगशिखोपनिषद अ. – ५

**शिवपरा –** ललितासहस्त्रनाम (४१०)

हयाप्रमाणे शिवतत्वाच्याही वर असल्याने हे शक्तितत्व महाकालातीता आहे,किंवा रुद्रग्रंथीचे भेदन केल्यानंतर भगवती कुंडलिनी शक्ति साधकाच्या समोर प्रगट होते म्हणूनही ती महाकालातीता होय.
**काल = मृत्यू = महामृत्यु = प्रलय**

**यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भवत ओदन |**
**मृत्युर्यस्योपसेचनं क इत्था वेद यत्र स: ||** - कठोपनिषद १-२-२५

सृष्टीच्या महाप्रलयाच्या प्रसंगी परब्रह्मरुपिणी शक्ति फक्त उरते.
ललितासहस्त्रनाम (२३२) असे वर्णन करते की

“ **महेश्वर महाकल्प महाताण्डवसाक्षिणी** “

**कलित सरणी** – सरणी – मार्ग – रेखा – किरण

कलित – सुंदर – सुसज्जित किंवा विकसित

श्रीविद्येची उपासना साधकाला भोग आणि मोक्ष देते यामुळे उपसानेचा हा मार्ग अत्यंत सुंदर आणि सर्वश्रेष्ठ असा आहे या कारणाने शक्ति ही कलित सरणी आहे.

श्री भगवती चे शरीर हे किरणांनी युक्त असे आहे, मातृका ह्या किरण आहेत आणि मातृकान्निच शक्तीचे शरीर बनले आहे अथवा मंत्राक्षर रूपी किरणांनी शक्तीचे शरीर बनले आहे.सध्याचे भौतिकशास्त्र असे सिद्ध करते की शक्ति (एनर्जि ) ही किरण रूपात विद्यमान असते आणि अश्याप्रकारे भगवती कलित सरणी आहे.

**कल्पित तनु** – भगवतीच्या शरीराचे वर्णन कोण करण्यास धजावेल ? हा फक्त कल्पनेचा विषय आहे आणि या कारणाने की शक्ति च्या पलीकडे (पार) काहीही नाही. संपूर्ण साक्षात्कार हा निर्विकल्प समाधीचा विषय असून तिथे साधक आणि साध्य हे एकरूप असतात अश्या परिस्थितीत वर्णन कोण करू शकतो ?

कुठल्याही वस्तूचे / व्यक्तीचे स्वरूप पूर्णतः तेव्हाच करता येणे शक्य आहे जेव्हा आपणच वस्तूरूप असू आणि आपणच जर वस्तूरूप असू तर वर्णन कोण करणार ?

प्रत्यक्ष श्रुति सुद्धा शक्तीचे वर्णन करू शकल्या नाहीत तर शक्ति ही केवळ अवर्णनिय आहे म्हणजेच शक्ति ही कल्पित तनु आहे.

श्री गोस्वामी तुलसीदास रामचरितमानसात अत्यंत सुरेख असे लिहितात की

“**गिरा अनयन नयन बिनू बानी**”

असेही म्हणता येईल की भगवती आपल्या भक्तांच्या कल्पनेनुसार शरीर धारण करते म्हणून ती कल्पित तनु आहे. जसे श्री गोस्वामी तुलसीदास म्हणतात की

**जिनके रही भावना जैसी , प्रभू मुरति देखी तिन तैसी |** बाल कांड

भगवती दृष्टी आणि वाचेचा विषय नसल्याने त्यासंबंधी केवळ कल्पनाच करावी लागते.

श्रुति म्हणतात की

**न चक्षुषा गृह्यते नावि वाचा** -- तृतीय मुण्डक प्रथम खण्ड – ८

**न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति** -- केन उपनिषत प्रथम खण्ड

**सुधासिंधोरन्तर्वसतिमनिशं** – सुधा = अमृत , सिन्धो = समुद्र , अंतर = मे / मधे वसति = असते / रहाते

अनिशं = सदा , नित्य , नेहेमी वगैरे

अनिशं ह्याची फोड अ + निश् , अ = नाही आणि निश = अंधार अशीही करता येते.

म्हणजे श्री भगवती सतत अमृताच्या समुद्रात वास करते.

श्री भगवत् पाद श्री शंकराचार्य सौंदर्यलहरीच्या ८ व्या श्लोकात म्हणतात की

**सुधासिन्धोर्मध्ये सुरविट-पिवाटी-परिवृते**

**मणिद्वीपे नीपो-पवनवति चिन्तामणि गृहे ।**
**शिवकारे मञ्चे परमशिव-पर्यङ्क निलयाम्**
**भजन्ति त्वां धन्याः कतिचन चिदानन्द-लहरीम् ॥ ८ ॥**

ह्याच अर्थाने भगवान श्री शंकराचार्य मंत्र – मातृका – पुष्प – माला ह्या काव्यात म्हणतात की

**कल्लोलोल्लसिततामृताब्धिलहरीमध्ये विराजन्मणिद्वीपे**

ललितासहस्त्रनामातही **सुधा सागर मध्यस्था** असे भगवतीचे वर्णन केले आहे.
सौंदर्यलहरीच्या ८ व्या श्लोकावर टीका करीत असतांना माझे परमपूज्य गुरुदेव सांगतात की

**निस्पंद परम शिव आनंद ब्रह्म परम पद सुधा सिंधु हे** |

श्र्वेताश्वतर उपनिषदाच्या ६ व्या अध्यायात लिहिले आहे की

**निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरञ्जनम् |**
**अमृतस्य परँ सेतुं दग्धेन्धनमिवानालं ||१९||**

शक्ति ही धारण करणाऱ्यात म्हणजे शक्तिमानात वास करते म्हणजेच ब्रह्माची पराशक्ती भगवती सुधा-सागरात वास करते याचाच अर्थ ती परमशिवाच्या मध्ये परमशिवाच्या हृदयात विराजमान असते.
सुधा-सागर या संदर्भात आचार्य श्री भास्कर राय ललितासहस्त्रनामाच्या टीकेत असे सांगतात की हा लोक अनेक (वरच्या) स्वर्गलोकांपैकी एक असून तैतिरीय ब्राह्मण १-६-२ नुसार हे स्थान अमृताने व्यापलेला आहे.
चंद्राचे मध्य स्थान (बैंदव स्थान) हे अमृताने भरलेले असून हे स्थान सहस्त्रार चक्रात असते आणि ह्याठिकाणी कुंडलिनी शक्तिचे निवास स्थान होय.वामकेश्वर तंत्र सांगते ...

**बिंदुस्थानं सुधा सिंधु पंच योन्याः सुरद्रुमाः | तत्रैव निप श्रेणी च तन्मध्ये मणि मण्डपं ||**
**तत्र चिन्तामणिकृतं देव्याः मन्दिर मुत्तमम | शिवात्मके महामन्चे महेशनोप बर्हणे ||**
**अतिरम्ये तत्र कशिपुश्च सदाशिवः | मृतकाश्च चतुष्पादा महेन्द्रश्च एतद्र्हः ||**
**तत्रास्ते परमेशानि महात्रिपुरसुन्दरी | शिवार्क मण्डलं द्रावयन्तिन्दु मण्डलं ||**
**तदद्भूतमृतस्यन्दी परमानन्दनन्दिता | कुल योषित्कुलं त्यक्त्वा परं वर्षणमेत्यसाः ||** भैरवयामले – वामकेश्वर तंत्रे

**सुधाब्दौ नंदनौद्याने रत्नमंडप मध्यगाम |**
**बालार्क मंडल भासां चतुर्बाहा त्रिलोचनाम् ||**
**पाशाङ्कुश शराश्चापं धारयन्ती शिवांश्रियम् |**
**ध्यात्वा च हृत्गतं चक्रं व्रतस्थ परमेश्वरिम् ||**

श्री चक्राच्या मधल्या बिंदुस्थानाचे नाव सुधा सिंधु आहे, आणि याठिकाणी श्री भगवतीचा निवास असतो.
श्री भगवतीची पूजा ह्याच स्थानी (बिंदुस्थानात) केली जाते.

सौंदर्यलहरीच्या ८ व्या श्लोकाच्या अरुण मोदिनी टिकेत परा ह्या संज्ञेची व्याख्या करतांना असे म्हटले आहे की

सुधा – सागर म्हणजे हिमालयापासून समुद्रापर्यंत अर्थात शिरापासून ( आपादतलमस्तक ) पायापर्यंत संपूर्ण मानवी शरीर हेच भगवतीचे निवासस्थान आहे.
**वासरमयीं** – दिवसा असलेल्या प्रकाशाप्रमाणे
भगवती परा शक्ति परम प्रकाशमान आहे तिच्या प्रकाशाने सर्व ब्रह्मांड प्रकाशित होते ( भगवती परा शक्तीच्या प्रकाशाने ब्रह्मांड दृष्टिगोचर होते ) जसे

**न तत्र सुर्यो भाति न चन्द्र तारकं नेमो विद्दुतो भान्ती कुतोयम अग्निः |**
**तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ||** - श्वेताश्वतरोपनिषत अ.६-१४

**वेदाहमेतं पुरुषं महान्तमादित्य वर्ण तमसः परस्तात् |**
**तमेव विदित्वाति मृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेयनाय ||८||** शु. यजुर्वेद , उत्तर नारायण सूक्त

**मूलाधारे मूलविद्यां विदयुतकोटि सम प्रभाम् |**
**सूर्यकोटि प्रतिकाशां चन्द्रकोटि द्रवां प्रिये |**
**बिसतन्तु स्वरुपाम् तां विन्दु त्रिवलयां प्रिये ||** ज्ञानार्णव तन्त्र

**तामग्नि वर्णां तपसा ज्वलन्तिं |**
**वैरोचनिं कर्म फ़लेषु जुष्टां ||** देव्युपनिषद ९

**नमस्ते अस्तु विद्यते नमस्ते स्तनयित्वे |**
**नमस्ते अस्त्वश्मने येनो दुडाशे अस्यसि ||** अथर्व कांड १ सूक्त १३

**शक्तिः कुण्डलिनिति यानि गदिता आइम् संज्ञा जगन्निर्माणे |**
**सततोद्यता प्रविलसत सौदामिनी सन्निभा |**
**शङ्खावर्त निभां प्रसुप्त भुजगाकारां ...||** - त्रिपुरा सार समुच्चय

**तटिल्लेखा-तन्वीं तपन शशि वैश्वानर मयीं |** सौंदर्यलहरी – २१

भगवतीच्या शरीराचे तेज ( दीप्ति ) कोटि सूर्यांच्या तेजाप्रमाणे आहे आणि ती अंधाराचा नाश करणारी आहे.
असेही म्हणता येइल की भगवति कुंडलिनी शक्ति च्या जागृत होण्याने अज्ञानरूपी अंधाराचा लोप होऊन ज्ञानरूपी प्रकाश उद्भवतो. जागृत झाल्यानंतर भगवति कुंडलिनी शक्ति ऊर्ध्वगामिनी होते आणि साधकाला दिव्य ज्योतींचे दर्शन होते, ह्या सगळ्या ज्योति कुंडलिनी शक्तिची रुपे होत.तैत्तिरीय आरण्यकात भगवती विद्युत सदृश्य मानले गेले आहे.

भगवतगीते मध्ये सांगितले आहे की

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुस्थिता ।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः** ॥ ११-१२ ॥

**मंत्र - भवानि त्वां वंदे भवमहिषी सत्वितसुख वपूः पराकारां देवीममृतलहरीमैंदवकलाम |**
**महाकालातितां कलितसरणी कल्पिततनुं सुधासिंधोरन्तर्वसतिमनिशं वासरमयीम् ||१||**

**मंत्रार्थ -** सुभगोदय स्तुती: ग्रंथाचा पहिला श्लोक हा मंगलाचरणाचा आहे.या श्लोकात आचार्यांनी बाला त्रिपुरसुंदरी आणि श्री विद्या ह्यांच्या मंत्रांचा उल्लेख ( संकेत ) केला आहे.

भवानी = विश्वजननी = महायोनी = वाग्भव बीज
सुख वपु: = आनंद = काम बीज
परा = शक्ति बीज
बाला = वाग्भव , काम , परा
याचप्रकारे श्री विद्येचे कादि , हादि आणि सादि ह्या रूपांचे संकेत प्रस्तुत श्लोकात आहेत.सदर मंत्र हे प्रत्यक्ष गुरुमुखातून मिळाले पाहिजेत किंवा गुरुनेच समजावून सांगितले पाहिजे हयास्तव वरील मंत्रांचा विस्तार येथे केलेला नाही. वेगवेगळे संप्रदाय अथवा परंपरा ह्यांचे वेगवेगळे भेद अथवा गौप्य (रहस्य) आहेत. वरील श्लोकातून शिव – मंत्राचा बोध होतो जसे –
वंदे = नमः
भवमहिषी = शिव
सत्वितसुख वपू: = य चा बोध होतो
मंत्रविधान ह्या ग्रंथात दिल्याप्रमाणे " य " चे अर्थ येणेप्रमाणे होतात किंवा मंत्रविधानातील खालील शब्दांमधून अश्याप्रकारे " य " वापरला जाऊ शकतो...

**यो वाणी वसुधा वायुर्विकृतिः पुरुषोत्तमः |**
**युगान्त श्वसनः शीघ्रं धूम्रा्रचि प्राणिसेवक ||१३९||**
**शङ्खभ्रमो जटि लोला वायुवेगी यशस्करः |**
**संकर्षणः क्षपा वालो हृदयम कपिला प्रभा ||१४०||**
**आग्नेयी व्यापकस्त्यागो होमो यानं प्रमा सुखं |**
**चण्ड सर्वेश्वरि धुमस्चामुन्डा सुमुखेश्वरि ||१४१||**
**त्वगात्मा मलयो माता हंसिनी भृन्गनायकः |**
**चेतना शोषको मीनो धनिष्ठानन्ग वेदिनि ||१४२||**

अश्याप्रकारे वंदे भवमहिषी ह्या शब्दसमूहाने पंचाक्षरी मंत्राचा "नमः शिवायै "चा बोध होतो (अर्थ समजतो).
वंदे = नमः , भवमहिषी = शिवा , सत्वितसुख वपू: = य अश्याप्रकारे नमः शिवाय हा शिवाचा पंचाक्षरी मंत्र तयार होतो.
कादि आणि हादि विद्येचा रचनाक्रम अथवा उकल

| **हादि प्रथम कूट** | **कादि प्रथम कूट** | |
|---|---|---|
| भव --- ह (शिव) | भव --- क | |
| महिषी --- स (शक्ति) | वंदे ---- ऐ | |
| सुख --- क | परा --- ई | |
| लहरीम् --- ल + हरीम् = ह्रीं | अथवा सुख = कामकला = ई | लहरीम् = ल + ह्रीं |

**दुसरे कूट**
भव = ह
महिषी = स
सुख = क
पराकारा च्या परं पदाने = ह किंवा अमृत = चंद्र = ह
लहरीम् = ल + ह्रीं

**तिसरे कूट**
भवमहिषी = स
सुख = क
लहरीम् = ल + ह्रीं
पहिल्या श्लोकाचा सारांश असा की आचार्यश्री असे प्रतिपादन करतात की श्रीविद्येची (भगवति श्री कुंडलिनी शक्ति) उपासना ही सर्वश्रेष्ठ अशी आहे आणि ती भोग आणि मोक्ष देणारी उपासना आहे,संपूर्ण ब्रह्मांडाच्या उत्पत्ति चे कारणही तीच आहे आणि साक्षात परब्रह्म ही तीच आहे. त्याचबरोबर असेही संगितले की भगवतीचे निवासस्थान किंवा तिचा वास हा शरीरातच असतो त्यामुळे अंतरयोगानेच शक्तीला जाणून घेता येते.
**सुधासिंधोरन्तर्वसति** ह्या पदाने आचार्यश्री असे प्रतिपादन करतात की समयाचारानुसार भगवतीचे मंदिर म्हणजे सहस्त्रार आहे तिथे तिचा नित्य वास असतो व येथेच तिची पूजा व्हावी. याठिकाणी सहस्त्रार चक्राच्या खालील म्हणजे निम्नस्तरावरील चक्रांची पूजा निषिद्ध आहे. म्हणजेच साधकाने कुंडलिनी शक्तीला मुलाधारपासून उत्थान करून सहस्त्रारात नेऊन त्या ठिकाणी तिचे ध्यान करावे आणि ध्यानाच्या या प्रकाराला आचार्य " वासरमयीम " असे म्हणतात.

**मनसतत्वं जित्वा नयनमथ नासग्रघटीतं | पुनर्व्यावृत्ताक्ष: स्वयमपि यदा पश्यति पराम् |**
**तदानिमेवास्य स्फुरति बहिरन्तर्भगवति | परानन्दाकारा परशिवपरा काचिदपुरा ||२||**

**सरळ अर्थ :-** जो योगी मनस तत्वाला जिंकून (लयकरून) मनाला एकाग्र करून नासाग्रावर दृष्टी स्थिर करून मग ती दृष्टी अंतर्मुख करून परादेवीला पहातो तेव्हा अंतर्बाह्य असे भगवतीचे स्फुरण होते. ही भगवती परशिवाच्याही पलीकडील किंवा परशिव-परायण आणि थोडीशी अपरा म्हणजे ऐहिक आहे.
**व्याख्या:-** यानंतर आचार्य श्लोक २ ते ६ पर्यन्त कुंडलिनी शक्तीचे जागरण तसेच आरोहण ( शक्ति वर उचलण्याची प्रक्रिया ) ह्याचे विवरण करतात. आचार्य श्री या ग्रंथात समयाचार मार्गाचे प्रतिपादन करतात.
समयाचार हा भावनाप्रधान असून ह्यात ध्यान हे मुख्य अंग आहे. आचार्यांनी ध्यानाचे महत्त्व सांगितले असून ध्यानाद्वारा कुंडलिनी शक्तीचे जागरण म्हणजे काय हे विशद करतात. कुंडलिनी शक्तीच्या जागरणासाठी
तीन महत्वाच्या बाबी सांगितल्या आहेत.
(१)मनस्तत्वं जित्वा
(२)नासाग्र घटितं
(३)पुनर्व्यावृत्ताक्ष स्वयमपि यदा पश्यति पराम्
किंवा पुनर्व्यावृत्ताक्षिवदयमपि यदा पश्यति पराम्

**मनस्तत्वं जित्वा** – मन तत्व जिंकुन म्हणजे मनाला वश करून किंवा चित्ताच्या वृत्तिंचा निरोध करून. सगळी इन्द्रिये मनाच्या आधीन असतात त्यामुळे मन वश केल्याने इन्द्रिये आपोआप ताब्यात येतात. पतञ्जलि योगाचा पाहिला चरण " योग:चित्तवृत्तिनिरोध: " इन्द्रियलोलुप मनुष्य योगसाधना करु शकेल काय ?

इन्द्रिये वश करायची असतील तर प्रथम मनाला वश करावे लागेल , मनोनिग्रहानेच ध्यान उत्तम प्रकारे होइल.
म्हणून उपासनेची अथवा योगाची सुरुवात इन्द्रिय-निग्रहाने होइल आणि ह्या साठी मनाला वश करणे आवश्यक आहे.
मनावर ताबा मिळविण्या आधी शरीरावर विजय मिळविणे गरजेचे आहे कारण ते सुद्धा दोन प्रकारचे आहे
अपक्व आणि परिपक्व.
योग साधनेचि सवय नसलेले शरीर हे अपक्व म्हणजे साधनेसाठी तयारी नसलेले असे असते, योगसाधनेने शरीर हे साधनेसाठी तयार  (परिपक्व) होते. परिपक्व शरीरामध्येच भगवती कुण्डलिनि शक्ति जागृत होउ शकते कारण योगाग्नि (योगसाधने) द्वारा तप्त झालेले शरीर जड्पणा आणि शोकरहित म्हणजे अलिप्त असे असते.
अपक्व शरीर हे सगळ्या दुःखाचे कारण आहे अश्या शरीराने ध्यान धारणा केली तर आसन स्थिर होणार नाही,हात पाय दुखायला लागतील, चित्त इतरत्र भटकेल  आणि मग ब्रह्म्याच्या या ध्यानाचा विफ़ल् असा शेवट होइल. जरी ज्ञानाद्वारे आणि विचाराद्वारे दुःखाच्या अनुभवांपासून मनाला तसेच इंद्रियांना परावृत्त केले तरीही इतर बाधा जसे गार – गरम , सुख - दुःख आदी मानसिक बाधे मुले अस्थिरता येईल.योगशीखोपनिषदात पहिल्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे

**विना देहेन योगेन न मोक्षं लभते विधे ।**
**अपक्वाः परिपक्वाश्च देहिनो द्विविधाः स्मृताः ॥ २५॥**
**अपक्वा योगहीनास्तु पक्वा योगेन देहिनः ।**
**सर्वो योगाग्निना देहो ह्यजडः शोकवर्जितः ॥ २६॥**
**जडस्तु पार्थिवो ज्ञेयो ह्यपक्वो दुःखदो भवेत् ।**
**ध्यानस्थोऽसौ तथाप्येवमिन्द्रियैर्विवशो भवेत् ॥ २७॥**
**तानि गाढं नियम्यापि तथाप्यन्यैः प्रबाध्यते ।**
**शीतोष्णसुखदुःखाद्यैर्व्याधिभिर्मानसैस्तथा ॥ २८॥**

ह्यामुळे सर्व प्रथम योगसाधनेदवारा शरीराला परिपक्व करणे आवश्यक आहे मगच मनावर ताबा मिळेल / ते वश होईल आणि हयानंतर पुढे सांगितल्याप्रमाणे ध्यान करणे शक्य होईल. भगवान स्वता: या विषयी गीतेच्या सहाव्या अध्यायात सांगतात की

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ ६-३५ ॥**
**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ६-३६ ॥**

याप्रमाणे आचार्य “मनस्तत्वं जित्वा “ या द्वारा कुंडलिनी शक्तीचे जागरणाच्या पूर्वी करावयाच्या तयारी संबंधी सुचना करतात. जेव्हा योगसाधनेदवारा आणि उपासनेद्वारा दोष निघून जातील तेव्हाच कुंडलिनी शक्ती जागृती होऊ शकते आणि या स्थितीतच ईश्वरी कृपेने शक्तिपात होइल. “ शक्तिपात “ या विषयी अधिक महितीसाठी माझे गुरुदेव श्री स्वामी विष्णुतीर्थ जी महाराज ह्यांनी रचलेल्या ग्रंथांचे अवलोकन / वाचन करावे.
तंत्रात ही याविषयी विस्तारपूर्वक माहिती आहे. आचार्य अभिनव गुप्त रचित “ तंत्रालोक ” ह्या ग्रंथात विस्तृत असे वर्णन केले आहे
योगाच्या आवश्यकते विषयी योगी श्री पूर्णानंद परमहंस (पूर्णानंदनाथ ) ह्यांच्या षटचक्र निरूपण ( श्री तत्व चिंतामणि च्या सहाव्या प्रकरणात ) सांगितले आहे की

**हुङ्कारेनैव देवीं यमनियमसमाभासशील: सुशीलो**
**ज्ञात्वा श्री नाथ वक्त्रात क्रममिति च महामोक्ष वर्त्मप्रकाशम |**
**ब्रह्मद्वारस्य मध्ये विरचयति सतां शुद्धबुद्धि स्वभावो**
**भित्वा तल्लिङ्गरूपं पवनदहन योरोक्रमेणैव गुप्तं ||५१||**

**नासाग्रघटितं** – इथे आचार्य प्रथम बाह्य ध्यानाने सुरुवात करावी असा आदेश देतात. वर सांगीतल्याप्रमाणे योग साधन झाल्यानंतर योग्याने आपली दृष्टी नासाग्रावर म्हणजे नाकाच्या शेंड्यावर (पुढील टोकावर) स्थिर करावी (नासाग्र या विषयी विद्वान आणि महात्मे ह्यांच्यात मतभेद आहेत , काहींचे असे मत आहे की अग्र हे डोक्याकडून घ्यावे आणि काही असे सांगतात की नाकाचे पुढील टोक हे नासाग्र होय यामधून दोन प्रकारचे ध्यान होते एक म्हणजे भ्रूमध्य ज्याला शांभवी मुद्रा असे म्हणतात आणि दुसरे नाकाच्या शेंड्यावर दृष्टी स्थिर करणे)
भगवान गीतेत हाच क्रम सांगतात,

**योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ ६-१० ॥**
**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ६-११ ॥**
**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ ६-१२ ॥**
**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**सम्प्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ ६-१३ ॥**

ध्यान हे दोन प्रकारचे आहे – बाह्य आणि अंतर
इथे प्रथम बाह्य ध्यान करावयाचे आहे . बाह्य ध्यानाचे संदर्भात अद्वयतारकोपनिषद सांगते की

**अथ बहिर्लक्ष्यलक्षणं । नासिकाग्रे चतुर्भिः षड्भिरष्टभिः**
**दशभिः द्वादशभिः क्रमात् अङ्गुलालन्ते नील द्युति श्यामत्व सद्दग्रक्त भङ्गीस्फुरत्पीत शुक्लवर्णद्वयोपेतं**
**व्योम यदि पश्यति स तु योगी भवति ।**

मंडल ब्राह्मणोपनिषदात ह्या विषयी सांगितले आहे की

**बहिर्लक्ष्यं तु नासाग्रे चतुः षडष्टदशद्वादशाङ्गुलीभिः क्रमान्नीलद्युतिश्यामत्व-सद्दग्रक्तभङ्गीस्फुरत्पीतवर्णद्वयोपेतं व्योमत्वं पश्यति स तु योगी चलनदृष्ट्या व्योमभागवीक्षितुः पुरुषस्य दृष्ट्यग्रे ज्योतिर्मयूखा वर्तन्ते ।**

त्रिशिखब्राह्मणोपनिषद बाह्य ध्यानाच्या विषयी असे सांगते की

**नासाग्रन्यस्तनयनो जिह्वां कृत्वा च तालुनि ।**
**दन्तैर्दन्तानसंस्पृश्य ऊर्ध्वकायः समाहितः ॥ १४५॥**

**संयमेच्चेन्द्रियग्राममात्मबुद्ध्या विशुद्धया ।**
**चिन्तनं वासुदेवस्य परस्य परमात्मनः ॥ १४६॥**

**स्वरूपव्याप्तरूपस्य ध्यानं कैवल्यसिद्धिदम् ।**
**याममात्रं वासुदेवं चिन्तयेत्कुम्भकेन यः ॥ १४७॥**

**सप्तजन्मार्जितं पापं तस्य नश्यति योगिनः ।**
**नाभिकन्दात्समारभ्य यावद्धृदयगोचरम् ॥ १४८॥**

बृहद्योगी याज्ञवल्क्य स्मृति च्या ९ व्या अ० श्लोक नं १८७ ते १९० मध्ये याविषयी नितांत सुंदर वर्णन आहे.
श्रीमदभागवताच्या एकादश स्कंदात भगवान सांगतात की

**सम आसन आसिनः समकायो यथा सुखं |**
**हस्तावूतसंग आधाय स्वनासाग्र कृतेक्षणः ||२२||**

पुनर्व्यावृत्ताक्षिवद्यमपि यदा पश्यति पराम्
पुनः व्यावृत अक्ष स्वयमपी (अक्षी द्वयमपि) यदा पश्यती पराम्
पुनः = परत , व्यावृत = उलटे फिरवून , अक्ष = डोळा / दृष्टी , स्वयमपी = स्वताः ,
या द्ययम अपी = दोन्ही , यदी / यदा पश्यती = पहातात , पराम = भगवती कुंडलिनी शक्ति.

प्रथम बाह्य नासाग्रावर ध्यान झाल्यानंतर आता आचार्य बाह्य ध्यानानंतर च्या अवस्थेचे वर्णन करीत आहेत अंतरध्यानाबद्दल सांगत आहेत की नासाग्रावर ध्यान सिद्ध झाल्यावर योग्याने आपली दृष्टी आंतमध्ये वळवून अर्थात शांभवी मुद्रा लावून (डोळ्यांना आंतमध्ये वळवून याचाच अर्थ शांभवी मुद्रा

लावून) पराशक्तीला पहावे / पराशक्तीचे ध्यान करावे. याठिकाणी आचार्य ध्यानाचे महत्त्व सांगत आहेत की याप्रकारे ध्यान केल्यावर कुंडलिनी शक्ति जागृत होते.

श्वेताश्वतरोपनिषत अध्याय १ मध्ये सांगतात की पूर्वी ऋषी मुनींनी महाशक्तीला ध्यानाद्वारेच पहिले

**ते ध्यानयोगानुगता अपश्यन् देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम् ।**
**यः कारणानि निखिलानि तानि कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः ॥ ३॥**

ध्यानाविषयी बृहद्योगी याज्ञवल्क्य स्मृति च्या ९ व्याअध्यायात सांगतात की

**ध्यानेन सदृशं नास्ति शोधनं पाप कर्मणाम |**
**श्वपाकेश्वपी भुञ्जानो ध्यायी नव तु लिप्यते || १७८ ||**
**ध्यानमेव परं ब्रह्म ध्यानमेव परं तपः || १७९ ||**
**सर्वपाप प्रसक्तोऽपि ध्ययेन्निमिषमत्वतम || १८० ||**

श्रुति सुद्धा सांगतात की

**चित्स्वरुपोहमिति सदा भावयन्त्सम्यङ्गी मिलिताक्षः किन्चिदुन्मिलिताक्षो**
**वान्तर्दृष्ट्या भ्रुदहरादुपरि सच्चिदानंद तेजः कुट रूपं परं ब्रह्मावलोकयस्तद्रूपो भवति ||२||**

**देहमध्ये ब्रह्मनाडी सुषुम्ना सूर्यरूपिणी पूर्णचन्द्राभा वर्तते ।**
**सा तु मूलाधारादारभ्य ब्रह्मरन्ध्रगामिनी भवति ।**
**तन्मध्ये तटित्कोटिसमानकान्त्या मृणालसूत्रवत् सुक्ष्माङ्गी कुंडलिनीति प्रसिद्धाऽस्ति ।**
**तां दृष्ट्वा मनसैव नरः सर्वपापविनाशद्वारा मुक्तो भवति ।** --- अद्वयतारकोपनिषद

**भ्रूमध्ये सच्चिदानन्दतेजःकूटरूपं तारकं ब्रह्म ।**
**तदुपायं लक्ष्यत्रयावलोकनम् ।**
**मूलाधारादारभ्य ब्रह्मरन्ध्रपर्यन्तं सुषुम्ना सूर्याभा ।**
**मृणालतन्तुसूक्ष्मा कुण्डलिनी । ततो तमोनिवृत्तिः ।** -- मण्डलब्राह्मणोपनिषद

घेरंडसंहितेत ध्यान या विषयाचे सुंदर वर्णन केले आहे.

**स्थूलं ज्योतिस्तथा सूक्ष्मं ध्यानस्य त्रिविधं विदुः।**
**स्थूलं मूर्तिमयं प्रोक्तं ज्योतिस्तेजोमयं तथा।**
**सूक्ष्मं बिंदुमयं ब्रह्म कुण्डलीपरदेवता ॥१॥**

**कथितं स्थूलध्यानं तु तेजोघ्यानं शृणुष्व मे । यद्ध्यानेन योगसिद्धिरात्मप्रत्यक्षमेव च ॥१५॥**
**मूलाधारे कुण्डलिनी भुजगाकाररूपिणी ।**
**जीवात्मा तिष्ठति तत्र प्रदीपकलिकाकृतिः ।**
**घ्यायेत्तेजोमयं ब्रम्हा तेजोघ्यानं परापरम् ॥१६॥**
**नाभिमूले स्थितं सूर्यमण्डलं वहिनसंयुतम् । घ्यायेत्तेजो महद्वयाप्तं तेजोध्यानं तदेव हि ॥१७॥**

|प्रकारन्तरम् |

**भ्रूमध्ये मनऊर्ध्वें च यत्तेज: प्रणवात्मकम् । ध्यायेज्ज्वालावलीयुक्तं तेजोध्यानं तदेव हि ॥१८॥**

। अथ सूक्ष्मध्यानम् ।

**तेजोध्यानं श्रुतं चण्ड सूक्ष्मध्यानं शृणुष्व मे । बहुभाग्यवशाद यस्य कुण्डली जाग्रती भवेत् ॥१९॥**
**आत्मना सहयोगेन नेत्ररन्ध्राद्विनिर्गता । विहरेद राजमार्गे च चंचलत्वान्न दृश्यते ॥२०॥**
**शाम्भवीमुद्रया योगी ध्यानयोगेन सिध्यति । सूक्ष्मध्यानमिदं गोप्यं देवानामपि दुर्लभम् ॥२१॥**
**स्थूलध्यानाच्छतगुणं तेजोध्यानं प्रचक्षते । तेजोध्यानाल्लक्षगुणं सूक्ष्मध्यानं परात्परम् ॥२२॥**

या श्लोकाच्या पहिल्या दोन ओळींमध्ये आचार्यांनी कुंडलिनी जागरणाचा विधी सांगितला आहे. या ठिकाणी आपण असेही म्हणू शकतो की जेव्हा योगी अष्टांग योगाच्या सातव्या पायरीवर पोहोचतो तेव्हा कुंडलिनी शक्ति जागृत होते. आणि कुंडलिनी शक्ति जागृतिचे फळ समाधी होय.
अष्टांग योगाच्या १ ते ५ पायऱ्या / स्तर – यम – नियम – आसन – प्राणायाम – प्रत्याहार
= मनोनिग्रह – नाडी आणि शरीरशुद्धी
अष्टांग योगाची पायरी ६ = नासाग्र घटितं
अष्टांग योगाची पायरी ७ = कुंडलिनी शक्ति जागरण - पुनर्व्यावृत्ताक्ष स्वयमपि यदा पश्यति पराम्
अष्टांग योगाची पायरी ८ = समाधी - कुंडलिनी शक्ति जागरणाचे फळ
तिसऱ्या ओळीत आचार्य कुंडलिनी शक्तिच्या स्फुरणाचे दोन प्रकार बाह्य आणि आंतर भेद सांगतात. अंतर स्फुरण म्हणजे साधकाला आनंदाचा अनुभव आणि इतर दिव्य अनुभव हे कुंडलिनी शक्ति जागरणानंतर होतात.साधक आत्मानंदात मग्न होतो आणि दिव्य भावांचा उदय होऊ लागतो. हा अनुभवाचा विषय असल्याने साधक स्वत: ह्याचा अनुभव घेतो , साधकाचे शरीर कांतिमय होऊ लागते , त्याचे बोलणे ऋजु आणि मधुर होते नाना प्रकारची काव्ये स्फुरू लागतात. श्री रामकृष्ण परमहंस , विवेकानंद , स्वामी रामतीर्थ , श्री रमण महर्षी ह्यांना असे दिव्य अनुभव आले होते. दुसऱ्यांना दिसु शकणारे हे जे अनुभव आहेत त्याला भगवतिचे बाह्य स्फुरण म्हणतात.दुसऱ्या व्यक्तिला शक्तिपात घडविणे हे सुद्धा शक्तीच्या बाह्य स्फुरणाचे लक्षण असू शकते.
जर एखाद्या ठिकाणी एखाद्या महाराणीने महाल बांधला तर त्या महालाची आंतुन आणि बाहेरून सजावट केली जाते, बाहेरून पहाणाऱ्या व्यक्तिला बाह्य सजावटी वरुन असे लक्षात येते की हा एखाद्या महाराणीचा महाल असावा, आतली सजावट तर महालात राहाणारे किंवा सेवेकरी / नोकर चाकर पाहू शकतात. साधकाचे शरीर हे
राजराजेश्वरी , महाराणी श्री जगन्नायिका , पराशक्ती कुंडलिनीचा महाल आहे. एखाद्या महाराणीच्या महालाची सुंदर सजावट केलेली असते तर कोटी-कोटी ब्रह्मांडनायिका ललितांबिका जिथे स्वत: निवास करते त्या ठिकाणाची सजावट / सुंदरता ही अवर्णनिय असेलच आणि त्या दिव्य महालाची आंतरिक शोभा तेथील सेवादार म्हणजेच साधक मनातच पाहू शकतो आणि अनुभव घेऊ शकतो . असेही म्हणता येईल की कुंडलिनी शक्ति जागृत झाल्यानंतर साधकाला बाहयाभ्यंतर ( आंतर + बाह्य ) अश्या दोन्ही प्रकारचे आनंद मिळतात याचाच अर्थ साधकाला भोग आणि मोक्ष दोन्ही प्राप्त होतात.शास्त्रात असे सांगितले आहे की श्री विद्येची उपासनेने भुक्ति आणि मुक्ति दोन्ही प्राप्त होतात.

**यत्रास्ति भोगो न च तत्र मोक्षो , यत्रास्ति मोक्षो न च तत्र भोग:|**
**श्री सुंदरी सेवन तत्पराणां भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ||**

दुर्गा सप्तशतित असे सांगितले आहे की

**आराधिता सैव नृणां भोग स्वर्गापवर्गदा |** १३ – ५

भगवती कुण्डलिनि शक्तिच्या जागरणाचे विधान आणि त्याविषयी माझे परम पूज्य परम गुरुदेव श्री योगेन्द्र विज्ञानी ह्यांनी त्यांच्या " महायोग विज्ञान " ह्या ग्रंथात अधिक प्रकाश टाकला आहे. माझे परम पूज्य गुरुदेव श्री विष्णुजी तीर्थ महाराज ह्यांनी आपल्या ग्रंथात विशेषत्वेकरून " देवात्म शक्ति " (डीव्हाईन पावर) आणि
" शक्तिपात " विशेष प्रकाश टाकला आहे, सुबोध पद्धतीने विवरण केले आहे. महाराष्ट्रातील प्रमुख संत श्री ज्ञानेश्वर ह्यांनी ज्ञानेश्वरी नामक गीतेवरील भाष्यात केलेले वर्णन असे आहे की येथे त्याचा विशेष उल्लेख करण्याचा मोह आवरता येत नाही, श्री ज्ञानेश्वर ह्यांनी कुंडलिनी शक्तिच्या जागरणाचा विधी आणि त्यानंतर येणाऱ्या विविध अनुभवांचे मनोहारी असे वर्णन केले आहे. श्री ज्ञानेश्वर म्हणतात

आता मी तुमच्यासमोर सर्व बाबींचा सांगोपांग उलगडा करीत आहे, परंतु या गोष्टींचा वास्तविक उपयोग स्वत: अनुभव घेतल्यानंतर होईल.योगाच्या अभ्यासासाठी सर्वप्रथम उपयुक्त असे स्थान / जागा निवडावयाला हवी.(स्थान कसे असावे ह्याचे वर्णन येथे दिलेले नाही पण ते वर्णन नितांतसुंदर आणि उपयुक्त असे आहे)
हे अर्जुना , योगाभ्यासासाठी विशिष्ट स्थान निवडतांना काळजी घ्यावी , आसपास जिथे एखादा मठ अथवा शिवालय असावे हयातून आपल्याला जे सोयीचे वाटेल ते घ्यावे , तिथे पूर्ण एकांतात बसावे. उपयुक्त स्थान निवडतांना असे पहावे की आपले मन येथे शांत आणि निश्चल राहील, अश्या जागेवर आपले आसन लावावे.
सगळ्यात वर स्वच्छ मृग चर्म असावे त्याखाली स्वच्छ धूत वस्त्र असावे , सर्वात खाली मऊ गवत / दर्भांकुर सपाट अश्या जमिनीवर असावे, आसन जास्त उंच झाले तर शरीर ढळू शकेल फार खाली असेल तर जमिनीला स्पर्श होईल, थोडक्यात आसन चांगले आणि सुखकर असावे जेणेकरून साधनेमध्ये व्यत्यय येणार नाही.
मग अश्या आसनावर बसून चित्त स्थिर करावे, सद्गुरूंचे स्मरण करावे, नंतर अंतर्बाह्य सात्विक भाव जागृत करून अतिशय आदरपूर्वक सद्गुरूंचे स्मरण करीत राहावे जोपर्यंत मनाची अहंकारी कठोर वृत्ती बदलू लागते, तसेच वासनेचे विस्मरण होत नाही , इंद्रियांची चंचलता थांबली पाहिजे. मन एकाग्र होऊन हृदय चक्राचे प्रतिबिंब दिसू लागते , मग त्या आत्मबोधाच्या अवस्थेत आसनावर बसून राहावे , आता असे समजू लागेल की शरीर आपोआप स्थिर झाले आहे , शरीरातील वायु एकत्र होऊ लागले आहेत.

या अवस्थेत प्रवृत्ती पराङ्गमुख म्हणजे आपली नेहेमीची चंचलता सोडून स्थिर होउ लागते , मग समजावे की चित्त समाधी अवस्थेकडे जाण्याची सम स्थिती (कर्मसाम्य दशा) आलेली आहे आणि योगाचा अभ्यास साधू लागतो.
आता कंबरेपासून वरच्या शरीराची स्थिती म्हणजे बसण्याची मुद्रा किंवा स्थिती कशी असावी ते समजावून सांगितले आहे,
आपल्या मांड्या पोटरीपाशी घट्ट धराव्या मग एका पायाच्या तळव्यावर दुसऱ्या पायाचा तळवा वाकडा करून गुदस्थानाचे ठिकाणी घट्ट ठेवावा , उजवी टाच गुदा व शिश्न ह्यांचे मधोमध जी चारबोटे जागा आहे त्यापैकी दीड दीड बोटे जागा सोडून मध्ये दाबावी व टाचेच्या मागील बाजूने शरीराचा तोल सांभाळून वर रेटावी आता असे आसन धरल्याने शरीर वर उचलले गेले ते कळणार नाही अश्या तऱ्हेने पायाचे दोन्ही घोटे वर धरावे हे अर्जुना असे केल्याने शरीराचा पूर्ण भार / तोल घोट्यावर राहील. हे पार्थ हे मुलबंध नामक आसनाचे वर्णन आहे त्याला वज्रासन असेही म्हणतात. याप्रमाणे गुदाचे ठिकाणी असलेल्या मूलाधार चक्राचे ठिकाणी मुलबंधाची स्थिती जमली की अपानवायु चा खाली जाण्याचा रस्ता / मार्ग बंद होतो आणितो आतल्या बाजूला जाऊ लागतो.
मग दोन्ही हाताची ओंजळ डाव्या पायावर आपोआप टेकविली जाते आणि खांदे वर गेल्याचे जाणवते, मेरूदंड सरळ / ताठ होतो आणि मस्तक आत झुकू लागते, पापण्या बंद होऊ पहातात . दृष्टी अर्धोन्मिलीत होते आणि नासाग्रावर स्थिर होते, आता दृष्टी आतल्या आत रहाते बाहेर जात नाही म्हणून ती अर्ध विकसित दृष्टी नासाग्रावरच स्थिर होऊ लागते मग दुसरीकडे पहावे किंवा कोण्या रूपाकडे लक्ष द्यावे ही इच्छा आपोआप मावळते , मस्तक खाली झुकून हनुवटी मानेच्या खालील खळग्या मधे रुतते आणि मस्तक छातीला घट्ट चिकटून बसते, ह्याला जालंधर बंध म्हणतात. बेंबी वर उठते, पोट आत जाते व सपाट होऊन हृदय कमल विकसित होते , हा शिस्नाचे वर आणि बेंबीच्या खाली जो बंध होतो त्याला उड्डीयान बंध म्हणतात. अश्या तऱ्हेने बंध – मुद्रा झाल्याने शरीराच्या बाहेरच्या भागात योगाभ्यासाची खूण उमटते आणि शरीराच्या अंतर्भागात सर्व मनोवृत्तींचे अस्तित्व मावळते आणि मनाच्या सगळ्या कल्पना नाहीश्या होतात आणि प्रवृत्ती म्हणजे कर्म करण्याची इच्छा बंद होते व शरीर आणि मन याचा विसर पडतो. मग भूक आणि निद्रा ह्यांची शुद्धहि हरपते.
हे अर्जुना हे जे मुलबंध आणि वज्रासन सांगितले त्या द्वारे बंधित झालेला / कोंडला गेलेला अपानवायु शरीरात मागे फिरून त्याचा आकार वाढतो / फुगू लागतो असा क्षुब्ध झालेला अपान वायु बेंबीच्या स्थानी असलेल्या मणीपुर चक्राला मधोमध धक्के देतो. यानंतर अपानवायूचा जोर ओसरल्यानंतर तो संपूर्ण शरीर रूपी घर शोधून बालपणापासून जो मळ शरीरात जमा झालेला असतो त्याला शरीराबाहेर टाकतो. अपान वायुची ही लाट एके ठिकाणी न थांबता आपल्या शरीरातील कोठयामधे शिरतो आणि मूलाधारातील कफ वात काढून टाकतो,मग तो रुधिरादी सप्त धातूंचे ( रस रक्त मांस मज्जा मेद अस्थि आणि शुक्र ) समुद्र उलथून टाकतो , मेदाचे डोंगर फोडून टाकतो , हाडाच्या आतमध्ये असलेली मज्जा ही नाहीशी करतो , वायु मार्गामधील अडथळे दूर करतो.सगळे अवयव शिथिल करतो ( त्यातील ताण काढून टाकतो ). अश्या लक्षणांनी नवीन साधक घाबरून जातो परंतु योगसाधना करणाऱ्यांनी धीर धरावा कारण जरी अपानवायु व्याधी उत्पन्न करीत असला तरी त्या
व्याधींचा नाश ही करीत असतो. शरीरातील कफ आणि पित्त हे जलाचे अंश आणि मांस व मज्जा आदी पृथ्वी तत्वाचे अंशांचे एकीकरण ( मिसळतो ) करतो. हे अर्जुना , अपानवायुचे असे कार्य चालू असतांना

आसनाच्या उष्णतेने कुंडलिनी नामक शक्ति जागृत होते. जसे केशराने न्हालेले नागिणीचे पिल्लू वेटोळे घालूनबसले आहे त्याचप्रकारे तशी ती साडेतीन वेढे घालून असलेली अधोमुख अशी निजलेली असते.विजेची जसे गोल कंकण असावे किंवा अग्निरेखे प्रमाणे किंवा लखलखीत सोन्याचे वेढे तशी कुंडलिनी संकोचून ( बंदिस्त अशी ) असते.
वज्रासनाचा दाब पडल्यावर ती जागृत होते आणि मग जसा तारा तुटतो किंवा तेजोमय असा सूर्य जागेवरून ढळलेला दिसावा किंवा तेजालाच जणू अंकुर फुटावा तशी कुंडलिनी आपले साडेतीन वेढे सोडून आळोखे पिळोखे देऊन नाभीकंदावर उभी होते. बरेच दिवसाची झोपलेली असल्याने भुकेनी व्याकूळ आणि जाणून बुजून तिला जागे केले असल्याने मोठया आवेशाने खाण्यासाठी आपले मुख वर पसरते मग हृदयकमळाखाली  असलेला अपानवायु ती आपलासा करून घेते ( व्यापून टाकते ) आपल्या मुखातील ज्वाळांनी आजुबाजु चौफेर व्यापते आणि मांसाचे घास खाऊ लागते जे जे मांसासहित आहे त्याचे भक्षण करून हृदयाचेही काही मांस खाते मग पायाचे तळवे तळहात ह्याचे शोधन करून वरचे भाग जे आहेत ते खाऊन टाकते,प्रत्येक अवयव आणि सांधे यांची तलाशी घेते, खालच्या भागालाही सोडत नाही , नखाचे सार (सातवा) शोषून घेते, त्वचाचे सत्व काढून अस्थिच्या आतील भागही चोखून काढते , शिरांचे जाळे स्वच्छ करून टाकते आणि या सगळ्याचा परिणाम म्हणजे बाहेर जाणारे रोम रंध्रेही बंद होतात.तहानेनी कासावीस झालेली कुंडलिनी मग रक्तादी सप्त धातूंना एका घोटात पिऊन संपवून टाकते आणि संपूर्ण शरीर रसहीन ( नीरस ) करून टाकते. मग नाकावाटे बारा बोटांइतका जो वायु वाहात असतो
(सर्वसाधारणपणे श्वास हा १२ बोटे वाहतो) त्याला पकडून परत आतमध्ये ओढते तेव्हा वर जाणारा प्राणवायू आणि खाली जाणारा अपानवायु हे एकरूप होतात इथे चक्रांचे पडदे फक्त आड असतात अन्यथा दोन्ही वायूंचे एकीकरण आधीच झाले असते परंतु तेव्हा कुंडलिनी क्षणभर व्यग्र होती आता ती म्हणते तुम्ही दोघेच फक्त उरलात ! हे अर्जुना याचा अर्थ असा की कुंडलिनी पृथ्वीतत्व खाऊन संपविते आणि जळाचा जो अंश आहे तोही फस्त करून टाकते. याप्रमाणे पृथ्वी आणि आप (पंचतत्वांपैकी) यांना खाल्ल्यावर कुंडलिनी ची भूक शांत होते आणि ती सुषुम्ना नाडीजवळ रहाते , इथे तृप्त झाल्यावर ती गरळ (विष) ओकते त्या गरळरूपी अमृताने प्राणाचे रक्षण व पोषण होते, जरी ते गरळ म्हणजे अग्नी असला तरीही तो अग्नी अंतर्बाह्य शीतलता देतो आणि सर्व अवयवांमध्ये गेलेले सामर्थ्य पुन्हा प्राप्त होते. नाड्यांचे मार्ग बंद झाल्याने त्यातील प्रवाह थांबतात शरीरातील अपान , व्यान , समान , उदान , नाग , देवदत्त , कूर्म , कृकल आणि धनंजय आदी नऊ प्राण नष्ट होतात आणि केवळ प्राण नावाचा वायु उरतो म्हणून शरीराचे पूर्वीचे धर्म रहात नाहीत. मग नाकाच्या डाव्या आणि उजव्या नाकपुडीतून वाहाणाऱ्या इडा व पिंगला नाड्या एक होतात त्याच्या गाठी ( मार्गातील अवरोध निघून जातो ) आणि षटचक्रांचे ( मूलाधार , स्वाधीष्ठान , मणीपुर, अनाहत , विशुद्ध , आज्ञा आदी ) भेदन होते
( म्हणजे त्यावरील आवरण नष्ट होते ) . त्यानंतर नाकपुडीतून वाहाणाऱ्या वायुला / नाडीला ज्यांना आपण चंद्र आणि सूर्याची उपमा देतो त्यांचे वाहाणे शून्यवत होते , बारीक अशी ज्योति सुद्धा त्या वायूंच्या सूक्ष्मत्वामुळे हलत नाही. बुद्धीची चंचलता नाहीशी होते, घ्राणेंद्रियाचा जो विषय (कार्य - वास घेणे) परिमळ तो सुद्धा कुंडलिनीच्या सोबत मध्य नाडी अर्थात सुषुम्ने मध्ये एकरूप होतो. या दरम्यान चंद्राच्या सत्राव्या कलेचे अमृत सरोवर कलून त्यातून पडणारे अमृत हे कुंडलीनीच्या मुखात ते चंद्रामृत पडते आणि सुषुम्नेतून ते अमृत प्राणांच्या योगे सगळ्या शरीराच्या अंगांमध्ये मुरते. जसे मुशीमध्ये तप्त

धातूचा रस भरला असता मेण विरघळून निघून जाते आणि मूस धातूने भरून जाते तसे चंद्राची अमृतमय सत्रावी कला शरीरात भिनते आणि वर फक्त त्वचेचे आवरणमात्र उरते. ढगाने झाकलेला सूर्य ढग विरल्यानंतर परत प्रकाशमान होतो तद्वत शरीर कांतिमय होते जणू मावळत्या संध्येचे रंग घेऊन शरीर बनले आहे की काय असे भासते, असे वाटते की शरीर पवित्र अश्या कुंकवाने भरले आहे अथवा चैतन्यरसाने बनले आहे , मला तर असे वाटते की हे शरीर नसून मूर्तीमंत शांती आहे. आनंदाच्या चित्रात भरलेले रंग होय किंवा आत्मसुखाचे स्वरूप आहे किंवा संतोषवृक्षाचे लावलेले रोप आहे.
सोनचाफ्याची कळी अथवा अमृताचा पुतळा  किंवा कोमलतेचे असे उपवन जिथे वसंत बहरला आहे. योग्याचे  शरीर म्हणजे शरद ऋतुतील आर्द्र थंडाव्याने पल्लवित झालेले चंद्रबिंब नव्हे स्वत: चंद्रबिंबच जणू आसनावर बसले आहे.
ज्यावेळी कुंडलिनी सत्राव्या कलेच्या अमृताचे पान करते तेव्हा शरीराची अशीच अवस्था होत असते आणि अश्या देहाला प्रत्यक्ष काळ सुद्धा भितो. आता जरा किंवा वार्धक्याची कला ( वार्धक्य मागे सरते ) , बालपण परत येते ( याचा अर्थ बालपणात जशी शरीराची कोमल दशा असते त्याप्रमाणे ) शरीर जरी बाल्यावस्थेप्रमाणे भासत असले तरी सामर्थ्य मात्र बाल पेक्षा बल प्रमाणे असते. सुवर्णवृक्षाला जणू रत्नकलिका यावी तद्वत नवीन नखेही येतात, नवीन दात येतात ते सुद्धा जणू हिऱ्यांच्या पंक्ति होत, शरीरावर नवीन रोम / केश येतात ते म्हणजे जणूकाही अणूसमान माणकांच्या कळ्या, हातापायांचे तळवे तर गुलाबी कमळाप्रमाणे होतात, डोळे अत्यंत तेजस्वी होतात जणू पूर्ण वाढ झालेला मोती जसा शिंपल्यात मावत नाही आणि शिंपले उघडले जाते आणि मोत्याची आभा दिसते तशी योग्याची दृष्टी दोन पापण्यांच्या मिठीत मावेनाशी होते आणि आवेशाने बाहेर निघू पहाते आणि आकाशाला गवसणी घालू पहाते. हे अर्जुना , हे लक्षात असू दे की सुवर्णकांतीसम देह जरी झाला तरी पृथ्वीतत्वाचा आणि जलतत्वाचा जडांश त्यात नसतो, मग तो योगी सातासमुद्रपलिकडील पाहु शकतो , स्वर्गातिल शब्द ऐकु शकतो, छोट्याश्या मुंगीचे सुद्धा मनोगत जाणून घेऊ शकतो, वायूच्या घोड्यावर स्वार होतो, पाण्यात चालत असता पाण्याचा स्पर्शही पायाला होत नाही , अश्या प्रकारच्या अनेक सिद्धि त्याला प्राप्त होतात हे अर्जुना , हे लक्षात घे की प्राणाचा हात धरून हृदयाकाशाची काठी हाती धरून सुषम्ना नामक मध्य नाडी चा जिना करून कुंडलिनी हृदयात पोहोचते ती कुंडलिनी तर प्रत्यक्ष जगन्माता होय.तिच जिवात्म्याची शोभा आहे आणि ओंकाराच्या अंकुरावरील सावली होय , ती शून्याचा आधार आहे , परमात्मारूपी शिवाची संपुट होय आणि ओंकाराची स्पष्ट जन्मभूमी होय. असो , जेव्हा अश्याप्रकारे सुकुमार कुंडलिनी जेव्हा हृदयात (अनाहत चक्रात , दहराकाशात ) प्रवेश करते तेव्हा आपोआप होणारा अनाहत नाद सुरू होतो , बुद्धी कुंडलिनी शक्तीच्या संगे चैतन्यस्वरूप होते त्यामुळे तिला नाद ऐकु येऊ लागतो.
या अनाहत नादाचे १० प्रकार असतात त्यातला पहिला प्रकार आहे त्याला घोष असे म्हणतात जो सर्वप्रथम ऐकु येतो आणि त्या घोषाच्या कुंडात ( अंतरात ) ओंकाराच्या रुपाप्रमाणे नादाची आकृती तयार होऊ लागते. पण याची जाणीव कल्पना करूनच जाणता येते परंतु कल्पना करणाऱ्याला तरी ते कसे काय कळणार की ह्या स्थानी कशाचा घोष होतो आहे. हे अर्जुना हे सांगावयाचे राहिले की जोपर्यंत प्राणवायुचा ( प्राणांचा ) लय होत नाही तोपर्यंत हृदयाकाशात ध्वनि उमटत राहतो म्हणून नाद राहतो.
या अनाहत नादातील मेघ नादाने ( ढगांच्या गडगडाटा सारखा ध्वनि/नाद ) हृदयाकाश दुमदुमून जाते आणि ब्रह्मरंध्राचा मार्ग मोकळा होतो. हे अर्जुना हृदयाकाशाच्यावर जे महाकाश अथवा ब्रह्मरंध्र आहे तेथे

चैतन्य आधार नसलेल्या स्थितीत असते ( उत्कंठीत अवस्थेत असते ) मग त्या महदाकाशाचे घरी कुंडलिनी देवी चैतन्याला आपले तेज अर्पण करते. बुद्धीच्या भाजी सोबत शुद्ध नैवेद्य अर्पण झाल्यावर द्वैताचा मागमूस उरत नाही आणि कुंडलिनीशक्ति ही प्राणस्वरूप होऊन जाते. तेव्हा ती कशी दिसते असे विचारल्यास, असे भासते की एखाद्या वायूने बनविलेल्या बाहुलीला सोन्याचा पीतांबर घालावा. आणि तिने तो काढून टाकून नग्न व्हावे किंवा असे वाटते की वायूची झुळूक लागून ज्योत विझली असावी, किंवा ज्याप्रमाणे आकाशात वीज चमकून जावी आणि आकाशातच नाहीशी व्हावी , त्याप्रमाणे हृदयकमलावरती सोन्याच्या सरीप्रमाणे दिसते किंवा प्रकाशरूप जळाचा झरा वाहात असावा आणि मग ती कुंडलिनी शक्ति हृदय प्रांतात शक्तीचे रूप शक्तीत सामावून जाते. अश्या अवस्थेत आपण तिला शक्ति असे म्हणत असलो तरी प्रत्यक्षात ती प्राणवायु आहे. फरक फक्त येवढाच आहे की तिचा नाद कांती आणि तेज दिसून पडत नाही आणि मग या अवस्थेत मनाला वश करणे वा वायूंना थांबविणे अथवा ध्यानाची गरज उरत नाही. मनात संकल्प - विकल्प उमटत नाहीत या स्थितिला पंचमहाभूतांना लय करणारी अशी समजली जाते. अश्याप्रकारे पिंडाने म्हणजे चैतन्यमय देहाकृतीने पिंडाचा म्हणजे पंचमहाभूतांचा ग्रास करणे हा नाथसंप्रदायाचा मार्ग, रहस्य अथवा मूळ उपाय आहे.
हिन्दी साहित्य कुटीर , बनारस द्वारा प्रकाशित आणि बाबू रामचंद्र वर्मा ह्यांनी अनुवादित केलेल्या ज्ञानेश्वरी च्या हिन्दी टीकेतील श्लोक ११ ते १४ पर्यंत चे भाष्य आहे १५ वा श्लोकही वाचायला हवा आणि खरतर पूर्ण अध्याय वाचणे गरजेचे आहे.
येणेप्रमाणे कुंडलिनी जागृत करणे आणि त्याचे स्फुरण याबद्दल सांगितल्यावर शेवटच्या ओळीत आचार्यश्री ह्यांनी भगवतीच्या स्वरूपाचे करतांना परानंदाकारा , परशिव परा , आणि कदाचीतपरा आदी शब्द वापरले आहेत.
**परानंद कारा –** भगवतीचे स्वरूप हे परानंद स्वरूप अथवा तसा आकार असलेले आहे. आनंद हा दोन प्रकारचा असतो , पर आणि अपर , संसारात जे अनुभव येत असतात त्यांना अपर म्हणतात कारणसंसारातील सगळी सुखे ही क्षणैक आहेत नाशिवन्त आहेत नश्वर् आहेत त्यात काहीहि तथ्य नाही त्यातील आनन्द हा वैषेयिक आहे. विषयांचा आनंद हा केवळ भ्रम असतो. दैनंदिन जीवनात आपण पहातो की माणुस विचार करतो की अमुक अमुक विषयात आपल्याला आनंद मिळेल पण थोड्या वेळातच त्यात काही कमी किंवा उणीव आढळून येते मग ते सोडून दुसऱ्या विषयात आनंद घेऊ लागतो, अश्या रीतीने वाळवंटात जसे मृगजळालाच खरे समजून त्यामागे फिरल्याने हाती काही लागत नाही तसेच संसारातितिल सुखांना खरे सुख समजून त्यामागे धावतो.संसार सुख हे सापेक्ष आहे खरा आनंद तर ब्रहमानंद आहे , परानंद आहे ज्याचा अनुभव समाधी अवस्थेत साधकाला येतो.
पहिल्या श्लोकात म्हटल्याप्रमाणे हेच भगवतीचे स्वरूप आहे स्वरूपाने व्यक्तीचा बोध होतो आणि आनंदाच्या योगे ब्रह्माचा अनुभव होण्याने त्याला ब्रह्माचे स्वरूप अथवा आकार म्हटले आहे. भगवतीचे हे स्वरूप जाणल्यानंतर साधक स्वत: आनंदमय होऊन जातो.
**परशिवपरा –** ह्या शब्दाचे दोन अर्थ होऊ शकतात
१ - परशिवाच्या पार ( पलीकडे ) भगवति परमशिवाच्या पलीकडे आहे, पहिल्या श्लोकाचा संदर्भ पहा.
२ – परशिवपरायण – ती परमसति आहे किंवा कुंडलिनी शक्ति जागृत होऊन परम शिवात विलीन होते म्हणून
पर – शिव – परायण.

काचिदपरा – काचिद , अपरा - इथे भगवतीची दोन रुपे दाखविली आहेत परा आणि अपरा , परा स्वरुपात ती परमब्रह्म आहे आणि कोटी कोटी ब्रह्मांड रूपाने तिचे अपरा स्वरूप दिसते. समस्त जग हे भगवतीचेच अपरा रूप अथवा ऐहिक स्वरूप आहे. सगळ्या ब्रह्मांडांचे सृजन अथवा उत्पत्ति तिच्याच अंशाने आणि ति अनंतशक्ति सगळ्या ब्रह्मांडांचे सृजन करूनही अनंत आहे जसे ,

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥**

हे सर्व तर तिचा एक अंशमात्र आहे

**पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ।**
**उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ॥२॥**
**एतावानस्य महिमातो ज्यायाँश्च पूरुषः ।**
**पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ॥३॥**
**त्रिपादूर्ध्व उदैत्पूरुषः पादोऽस्येहाभवत्पुनः ।**
**ततो विष्वङ्ः व्यक्रामत्साशनानशने अभि ॥४॥**

म्हणून समस्त जगात जे जे दिसते ते सर्व भगवतीचे अपरा रूप आहे.
**ईशावास्यमिदँ सर्वं यत्किं च जगत्यां जगत् ।**

भगवतीचे परा स्वरूप तर परम पद आहे , परमब्रह्म आहे
इथे असेही म्हणता येईल की भगवति आपल्या उपासकांना भोग आणि मोक्ष दोन्ही देते म्हणून ती परा आणि अपरा अशी उभयरुपी आहे.

[३]

**मनो मार्ग जित्वा मरुत इह नाडी गण जुषो निरुध्यार्कं सेन्दु दहनमपि संज्वाल्य शिखया | सुषुम्णां संयोज्य श्लथयति च षडग्रन्थि शशिनं तवाज्ञा चक्रस्थं विलयति (विलसति) महायोगी समयी ||**

**सरळ अर्थ :-** मनोमार्ग जिंकून म्हणजेच मनाचा निरोध करून , नाडी समुहामध्ये वायुचा निरोध करून किंवा नाडी समूहाला वायूने परिपूर्ण करून सूर्य आणि चंद्राचा निरोध करून अग्नी तत्व प्रज्वलित करून त्याच्या शिखेद्वारे सुषुम्नेला सोबत घेऊन सहा ग्रंथी असलेल्या चंद्राला अथवा सहा ग्रंथी सैल करतात किंवा मोकळ्या करतात असा समयाचारी योगी तुझ्या आज्ञाचक्रात मिसळून जातो ( अथवा विलास करतो ) वा तुझ्या आज्ञाचक्रात असलेल्या चंद्रात योग्याच्या मनाचा लय होतो.
**व्याख्या :-** महाशक्ती कुंडलिनीचे स्फुरण कसे होते तिचा आकार कसा असतो हे विशद केल्यावर आचार्य या नंतर कुंडलीनीच्या ऊर्ध्व चालनाचे वर्णन करतात. कुंडलिनी शक्तिला मूलाधारापासून वर

नेण्याच्या प्रक्रियेला योग शास्त्रात शक्ति – चालन असे म्हणतात आणि यासाठी आचार्यांनी खालील उपाय दिले आहेत.

१) **मनोमार्ग जित्वा** :- योगाच्या सहाय्याने – वर सांगितल्याप्रमाणे.
२) **मरुत इह नाडी गण जुषो** :- कुंभकाने नाड्यांना वायूने सम्पृक्त करून
३) **निरुध्यार्कं सेन्दु** :- इडा आणि पिंगला नाड्यांमधील वायुचा प्रवाह थांबवून म्हणजे चंद्र आणि सूर्य स्वर थांबवून म्हणजे कुंभक करून.
४) **दहनमपि संज्वाल्य** : - योगाग्नि प्रकट करून.
५) **शिखया सुषुम्णां संयोज्य** :- त्या अग्निशिखेला सुषुम्नेत मिळवून किंवा अग्निशिखेशी सुषुम्ना जोडून.
६) श्लथयति षडग्रंथी :- षटचक्रांचे भेदन करून.
७) शशिनं तव आज्ञा चक्रस्थं विलयति :- आज्ञाचक्रात असलेल्या चंद्रा मधे विलीन करून.

**भुजंगाकारेण मूलाधारे समाश्रिता | शक्तिः कुंडलिनी नाम बिसतंतुनिभा शुभा ||**
**मूल कंन्दं फणाग्रेण द्रष्ट्वा कमल कन्दवत् | मुखेन पुच्छं संग्रह्य ब्रह्मरन्ध्र समान्वित ||**
**पद्मासन गताः स्वस्थो गुदमाकुञ्चय साधकः | वायुमुर्ध्वगतिं कुर्वन कुम्भकाविष्ठ मनसः ||**
**वायव्याघात क्षदाग्नि स्वाधिष्ठानगतो ज्वलन | ज्वलनाघातपवनाघातोरून्निद्रितोऽहिराट् ||**
**रुद्रग्रन्थिंच ततो भित्वा विष्णुग्रन्थिं भिनत्यथ | ब्रह्मग्रन्थिंच भित्येव कमलानि भिनत्ति षट् ||**
**सहस्त्रकमले शक्तिः शिवेन सह मोदते | साचवस्था परा ज्ञेयः सैव निवृत्ति कारणं ||**

ध्यानबिंदु उपनिषत् आणि योगचुडामणी उपनिषत् सुद्धा हेच सांगतात.

**मुखेनाच्छाद्य तद्द्वारं प्रसुप्ता परमेश्वरी ।**
**प्रबुद्धा वह्नियोगेन मनसा मरुता सह ॥ ३८॥**

**सूचिवद्गात्रमादाय व्रजत्यूर्ध्वं सुषुम्नया ।**
**उद्घाटयेत्कवाटं तु यथाकुञ्चिकया गृहम् ।**
**कुण्डलिन्यां तथा योगी मोक्षद्वारं प्रभेदयेत् ॥ ३९॥**

**कृत्वा सम्पुटितौ करौ दृढतरं बध्वा तु पद्मासनं**
**गाढं वक्षसि संनिधाय चुबुकं ध्यानं च तच्चेष्टितम् ।**
**वारंवारमपानमूर्ध्वमनिलं प्रोच्छारयेत्पूरितं**
**मुञ्चन्प्राणमुपैति बोधमतुलं शक्तिप्रभावान्नरः ॥ ४०॥ -** योगचुडामणी ३८ ते ४०, ध्यानबिंदुउपनिषत् ६६ ते ६९

**मनोमार्ग जित्वा** – दुसऱ्या श्लोकात आचार्यांनी हेच प्रतिपादन केले आहे याचा अर्थ असा की मनाचा निरोध हा अत्यंत आवश्यक आहे. मनाचा निरोध झाल्यावर अथवा मन वशीभूत झाल्यावरच धारणा करता येते. धारणेनेच प्राणवायुचा सुषुम्नेमध्ये प्रवेश होईल. यासाठी आचार्यश्री कथन करतात की वरील

प्रकारे मन वश केल्यावर मग नाड्यांना वायूने भरावे. क्षुरिकोपनिषद सांगते की योगी आपल्या ध्यानाने आणि धारणेने नाड्यांमधील प्राणाचा संचार थांबवून प्राणाला सुषुम्नेत वळवावा मग परब्रहमाची प्राप्ती होईल.
**मरुत इह नाडी गण जुषो** – आता या ठिकाणी आचार्य नाड्यांना वायूने सम्प्रुक्त किंवा युक्त करावयाची आज्ञा देतात म्हणजे नाड्यांमधील प्राणाचा निरोध करण्यास सांगतात आणि हे प्राणायमाने करता येईल, यासाठी योगशास्त्र विशेषेकरून भस्त्रिका आणि कुंभक करावे असे सांगतात. प्राणायामाने वायुचा निरोध होऊ शकतो.
भगवान गीतेत सांगतात की

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥ ५-२७ ॥**
**यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ ५-२८ ॥**

प्राणायामाचे महत्त्व उपनिषदात सांगितले आहे ते असे

**यथा पर्वत धातूनां दह्यन्ते धमनान्मलाः ।**
**तथेन्द्रियकृता दोषा दह्यन्ते प्राणनिग्रहात् ॥ ७॥**

**प्राणायामैर्दहेद्दोषान्धारणाभिश्च किल्बिषम् ।**
**प्रत्याहारेण संसर्गाद्ध्यानेनानीश्वरान्गुणान् ॥ ८॥**

**किल्बिषं हि क्षयं नीत्वा रुचिरं चैव चिन्तयेत् ॥ ९॥** - अमृतनादोपनिषत

**पद्मासन स्थितो योगी नाडीद्वारेषू पुरयन।**
**मारूतं कुम्भयन्यस्तू स मुक्तो नात्र संशय॥**

**प्राणायामो भवेदेवं पातकेन्धनपावकः ।**
**भवोदधिमहासेतुः प्रोच्यते योगिभिः सदा ॥ १०८॥**

नाड्यांना वायूने भरल्याने नाडीशुद्धी होईल आणि नाडीशुद्धी झाल्यावरच शक्ति चालन संभवेल.
नाडी शुद्धी बद्दल चे विवरण घेरण्ड संहितेच्या ५ व्या अध्यायात दिले आहे. नाडी शुद्धी बद्दल फारच छान माहिती दिलेली आहे. त्यात नाडीशुद्धीचे दोन प्रकार 1) समनु 2) निर्मनु
समनु – प्राणायामासह धारणा.
आचार्यहि सदर श्लोकात हाच संकेत देतात.
या प्रकारे प्राणायामाने नाडी शुद्धी झाल्यावर योग्याने इडा व पिंगला ह्यांच्या प्रवाहाला थांबवावे (निरुध्यर्कं सेन्दु) आणि कुंभकाने योगाग्नि चेतेल (दहनमपि संज्वाल्य)
या विषयी योगचूडामणी उपनिषद असे सांगते की

**एवं द्वारं समाश्रित्य तिष्ठन्ते नाडयः क्रमात् ।**
**इडापिङ्गलासौषुम्नाः प्राणमार्गे च संस्थिताः ॥ २१॥**

**सततं प्राणवाहिन्यः सोमसूर्याग्निदेवताः ।**
**प्राणापानसमानाख्या व्यानोदानौ च वायवः ॥ २२॥**
**यथेष्टधारणं वायोरनलस्य प्रदीपनम् ।**
**नादाभिव्यक्तिरारोग्यं जायते नाडिशोधनात् ॥ ९९॥**
**बद्धपद्मासनो योगी नमस्कृत्य गुरुं शिवम् ।**
**नासाग्रदृष्टिरेकाकी प्राणायामं समभ्यसेत् ॥ १०६॥**
**द्वाराणां नव संनिरुध्य मरुतं बध्वा दृढां धारणां**
**नीत्वा कालमपानवह्निसहितं शक्त्या समं चालितम् ।**
**आत्मध्यानयुतस्त्वनेन विधिना ग्निन्यस्य मूर्ध्नि स्थिरं**
**यावत्तिष्ठति तावदेव महतां सङ्गो न संस्तूयते ॥ १०७॥**

योगशिखोपनिषदातील पहिल्या अध्यायात

**वायुना ज्वलितो वह्निः कुण्डलीमनिशं दहेत् ।**
**सन्तप्ता साग्निना जीवशक्तिस्त्रैलोक्यमोहिनी ॥ ८५॥**

**प्रविशेच्चन्द्रतुण्डे तु सुषुम्नावदनान्तरे ।**
**वायुना वह्निना सार्धं ब्रह्मग्रन्थिं भिनत्ति सा ॥ ८६॥**

**विष्णुग्रन्थिं ततो भित्त्वा रुद्रग्रन्थौ च तिष्ठति ।**
**ततस्तु कुम्भकैर्गाढं पूरयित्वा पुनःपुनः ॥ ८७॥**

**यथैव निश्चितः कालश्चन्द्रसूर्यनिबन्धनात् ।**
**आपूर्य कुम्भितो वायुर्बहिर्नो याति साधके ॥ १२०॥**

आणि सहाव्या अध्यायात सांगतात

**वामदक्षे निरुन्धन्ति प्रविशन्ति सुषुम्नया ।**
**ब्रह्मरन्ध्रं प्रविश्यान्तस्ते यान्ति परमां गतिम् ॥ ३४॥**

शांडिल्योपनिषत इडा आणि पिंगले बद्दल सांगते की

**इडायां चन्द्रश्चरति । पिङ्गलायां रविः । तमोरूपश्चन्द्रः ।**
**रजोरूपो रविः । विषभागो रविः । अमृतभागश्चन्द्रमाः ।**

याप्रमाणे रवी आणि चंद्र ह्यांच्या  निरोध , तमोगुण व रजोगुण यांना वश करून अथवा जिंकून करता येतो. रामायणाच्या उत्तरकांडात गोस्वामी तुलसीदास म्हणतात.

**जोग अगिनि प्रकट करी तब कर्म सुभासुभ लाई |**
**बुद्धि सिरावे ग्यान घृत ममता मल जरी जाई || ११७ ||**

वर सांगितल्याप्रमाणे जेव्हा योगी इडा आणि पिंगलेचा रोध करतो (अडवून) ( इथे अर्क = इंदु = चंद्र आणि पिंगलेचा रोध म्हणजे कुंभक असा अर्थ अथवा इडा आणि पिंगला यामध्ये प्राणवायू चा प्रवाह रोखून त्याला सुषुम्ने मध्ये घेऊन जाणे असा अर्थ होऊ शकतो ) तेव्हा त्यात योगाग्नि प्रकट होतो आणि

त्या योगाग्नीच्या शिखेला ( अग्निशिखेचा वरील भाग ) सुषुम्नेशी एकत्र करतो (शिखया सुषुम्णां संयोज्य ) , म्हणजे प्राणायामाद्वारा जो योगाग्नि उत्पन्न होतो त्या द्वारा सुषुम्नेत असलेला मल जळून जातो आणि सुषुम्नेचे द्वार उघडले जाऊन तिच्यात प्राणाचा संचार होऊ शकेल. किंवा सूर्य आणि चंद्र नाडींमधील प्राणाचा संचार बंद होतो तेव्हा कुंडलिनी शक्ति अग्निमुळे तप्त होऊन आपले वेढे सोडून सरळ होते व सुषुम्ना मार्गावर चालू लागते आणि पुढे ती सहाही चक्रे उघडली जातील / त्यांचा वेध होईल. इथे आचार्य सुषुम्नांतर्गत सहा चक्रांकडे आपले लक्ष वेधित आहेत.
कुंडलिनीचे स्वरूप दीपशिखे ( दिव्याच्या ज्योतीसारखे ) सारखे आहे आणि ती अग्निसदृश आहे. वैदिक वाङ्मयात कुंडलिनी शक्तीला अग्नी असेच समजले गेले आहे, म्हणून **दहनमपि संज्वाल्य** चा अर्थ कुंडलिनी जागृत करून असा घेता येतो म्हणजेच प्राणायामा द्वारा कुंडलिनी शक्ति जागवून तिच्या वरच्या टोकाशी ( शिखेशी ) सुषुम्नेला जोडून म्हणजे कुंडलिनी शक्तीचा सुषुम्ने मध्ये प्रवेश करावा.

**शशिनं तवाज्ञा चक्रस्थं विलयति :-** अश्या रीतीने जेव्हा महामाया पारमी शक्ति  कुंडलिनी सुषुम्ना मार्गावर चलित होते तेव्हा सहाही  चक्रांचा वेध घेत आज्ञा चक्रात पोहोचेल , आज्ञाचक्र हे चंद्राचे स्थान आहे.
चंद्र याचा अर्थ मन असाही घेता येतो कारण चंद्र हा मनाचा द्योतक आहे ( चंद्रमा मनसो जाता: ), त्यामुळे असेही म्हणता येईल की आज्ञा चक्रात पारमी शक्ति कुंडलिनी शक्तीच्या रूपात व्यक्त होते.
“ शशिनं तव आज्ञा “ चा अर्थ सोम कुंडलिनी असा घेता येईल म्हणजेच कुंडलिनी आपल्या अग्नी आणि सूर्य भागाचे वेध करून चंद्र खंडात विलीन होते. आज्ञा चक्र हे चंद्राचे पीठ (स्थान) आहे त्यामुळे “तव आज्ञा चक्र शशिन:” असे म्हणता येते , आज्ञा चक्र हे चंद्राचे स्थान मानले आहे त्यामुळे आज्ञा चक्रात कुंडलिनीला आणावयाचा आदेश दिला आहे.
आचार्यांनी या ठिकाणी “ तव “ शब्दाचा प्रयोग केला आहे त्यामधून असे दर्शविले आहे की सगळी चक्रे सुषुम्नेच्या अधीन असल्याने भगवतीचीच आहेत कारण सुषुम्ना भगवतीचे शरीर आहे, ती पारमी शक्ति स्वत: सगळ्या ठिकाणी आपले रूप बदलून असते किंवा संपूर्ण ब्रह्मांड भगवतीचे शरीर आहे मग त्यातून इतर काही वेगळे कसे असू शकेल ? अथवा साधकाचा “ अहं ” गळाल्यानंतर सगळे शक्तिरूपच दिसते .
माझे परम पूज्य गुरुदेव श्री स्वामी विष्णुतीर्थ जी महाराज यांनी सौंदर्यलहरी या टीकेमध्ये श्लोक ३६ पान नं २०४ वर “ तव ” शब्दावर सुंदर प्रकाश टाकला आहे.
**महयोगी समयी :-**  अश्या रीतीने ज्याने षटचक्र भेदन करून कुंडलिनी शक्तिचा आज्ञाचक्रात लय केला आहे तो समयाचार जाणणारा महयोगीच होय. महा शब्दाचा वापर करून आचार्य ह्या ठिकाणी समयाचाराचा अवलंब करणाऱ्या योग्याची श्रेष्ठता मांडतात , अथवा योगी म्हणजे असा व्यक्ति  जो योग साधना करतो आणि जो साधकाने कुंडलिनी शक्ति जागृत करून चक्रभेदन केले आहे तो महयोगारूढ असल्याने महायोगी आहे.
कुंडलिनी जागृती नंतर महायोग सुरू होतो ( पहा माझ्या परम पूज्य गुरुदेव श्री स्वामी विष्णुतीर्थ जी महाराज यांचे “ महायोग विज्ञान “)

[४]

**यदा तौ चन्द्रार्कौ निजसदनसंरोधनवशादशक्तौ (दशक्ता ) पीयूषस्रवणहरणे सा च भुजगी ।**
**प्रबुद्धा क्षुत्क्रुद्धा दशति शशिनं बैंदवगतं सुधाधारासारैः स्नपयसि तनुं बैंदवकले ॥ ४॥**

सरळ अर्थ :- जेव्हा सूर्य आणि चंद्र आपआपल्या ठिकाणी उत्तम प्रकारे रोखून ठेवलेले असल्याने अमृतधारा मिळविण्यास सक्षम नसल्याने भुजगी म्हणजे कुंडलिनी जागृत होऊन भुकेने व्याकूळ असल्याने बैंदव स्थानी जाऊन चंद्राचा वेध घेते , हे बैंदव कले तू अमृतधारेत शरीराला स्नान घालतेस.

**स्पष्टीकरण**:- श्री ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीत सहाव्या अध्यायात या विषयी अत्यंत सुरस वर्णन केले आहे. सुभगोदय स्तुतिच्या दुसऱ्या श्लोकाच्या स्पष्टीकरणात सदर वर्णन आलेले आहे. वराह उपनिषदाच्या पाचव्या अध्यायात याविषयी वर्णन केले आहे. माझ्या परमपूज्य गुरुदेवांनी त्यांच्या इंग्रजी पुस्तक डिव्हाइन पॉवर
( देवात्म शक्ति ) मध्ये याविषया संदर्भात विस्तृत विवरण दिले आहे.
शरीरात सुषुम्नेच्या डाव्या आणि उजव्या बाजूस इडा आणि पिंगला नाड्या असतात, डाव्या नाडीत चंद्र आणि उजव्या नाडीत सूर्याचे स्थान असते. चंद्र डाव्या नाडीने संचार करीत शरीरातील इतर सर्व नाड्यांमध्ये अमृत स्त्रवण करीत जातो तर सूर्य उजव्या नाडीच्या माध्यमाने ते अमृत शोषून घेतो. सूर्य हा विष आणि चंद्र अमृत स्वरूप आहेत. जेव्हा चंद्र आणि सूर्य मूलाधार चक्रात येतात तेव्हा अमावास्या झाली असे म्हटले जाते. ज्योतिष शास्त्रानुसार जेव्हा सूर्य आणि चंद्र एका राशीत एका अंशात येतात तेव्हा अमावास्या होते याचाच अर्थ मूलाधार चक्रात सूर्य आणि चंद्र एका राशीत येतात. याविषयी दर्शनोपनिषदा तिल ४० ते ४७ ऋचा पहाव्या.
अमावास्येतूनच इतर तिथिंचा उदय होतो. अश्या प्रकारे मूलाधारात सूर्य आणि चंद्र एकत्र आल्यावर सूर्याच्या किरणांनी चंद्रमंडल द्रवित होऊन अमृत स्त्रवू लागते आणि ते अमृत मूलाधार कुंडात जमा होते आणि कुंडलिनी ते अमृत शोषून घेते (पिऊ लागते) ,जेव्हा चंद्र आणि सूर्याची गती मंद होते म्हणजेच योगी जेव्हा प्राणयामाद्वारा सूर्य , चंद्राला आपआपल्या जागेवर रोखून ठेवतो तेव्हा अमृत झरणे थांबते आणिकुंडलिनी शक्तीला अमृत न मिळाल्याने ती अशक्त होते आणि जोडीला योगद्वारा उत्पन्न झालेला अग्नीमुळे ( वायुमुळे प्रेरित झालेला स्वाधिष्ठानातिल अग्नी ) मूलाधारातील अमृत उडून ( सुकून ) जाते आणि अश्या रीतीने कुंडलिनीला अमृत न मिळाल्याने ती क्रुद्ध होऊन भुकेमुळे त्रासून गेलेली अशी ती नागाप्रमाणे फूत्कार करीत आपले वेटोळे सोडून सरळ होते आणि सुषुम्ना नाडी मार्गातील सहा चक्रे आणि तीन ग्रंथिंचा वेध करीत सहस्त्र पाकळ्या असलेल्या कमळामधील चंद्रमंडळाचा वेध करते त्यामुळे चंद्रमंडळात छिद्र पडते व त्यातून अमृत धारा खाली पडू लागते आणि त्या धारेने आज्ञा चक्रातील चंद्रमंडळ अमृताने भरून जाते किंवा चंद्रमंडळ अमृताने न्हाऊन जाते आणि या ठिकाणाहून अमृत नाड्यामधून पूर्ण शरीरात वाहू लागते.
वर वर्णन केल्याप्रमाणे कुंडलिनी आपल्या मुखाने सुषुम्नेला आच्छादित करून मूलाधारात सुप्त होऊन रहातेआणि सुषुम्ना कुहरात असलेले अमृत ग्रहण करीत रहाते पण सूर्य आणि चंद्र ह्यांना रोखून धरल्यावर कुंडलिनीला होणारा अमृत स्त्राव बंद होतो आणि ती भुकेने व्याकुळ होऊनजागी होते. ह्या ठिकाणी आचार्य कुंडलिनी जागरणाचे वर्णन करीत आहेत.

**अथवा**:- सूर्य किरणांमध्ये प्रकाश उष्णता आणि प्राणशक्ती असते. उष्णता विषाप्रमाणे कार्य करते. औषध विज्ञानाचा सिद्धान्त असे सांगतो की अल्प मात्रेत घेतल्यास विष हे अमृताप्रमाणे कार्य करते म्हणजेच सूर्याची उष्णता एका विशिष्ट मात्रेत आपल्या शरीराला आवश्यक आहे , सूर्यापासून मिळणाऱ्या उष्णतेमुळे शरीरातील पचनक्रिया योग्य तऱ्हेने होते परंतु अधिक मात्रेत हीच उष्णता घातक ठरू शकते.
चंद्र हा अप्रकाशित आहे आणि सूर्यप्रकाशामुळे चंद्रबिंब आपल्याला दिसते. सूर्याची किरणे चंद्रावर जेव्हा परावर्तीत होऊन येतात तेव्हा त्यातील उष्णता निघून जाते ( चंद्रप्रकाश शीतल असतो ) आणि जणू अमृत स्त्राव होतो. मणीपुरस्थित सूर्य आणि सहस्त्रारातील चंद्र हे कार्य सतत करीत असतात ( साधारणपणे सूर्य अधोमुख असल्याने त्याची किरणे वर जात नाहीत म्हणून अमृतापेक्षा विषाचा स्त्राव जास्त होतो )आणि मूलाधारात प्रसुप्त कुंडलिनी अमृतपान करीत रहाते. जेव्हा सूर्य आणि चंद्राचे कार्य थांबविले जाते तेव्हा अमृत प्राशनास न मिळाल्याने अशक्त झालेली कुंडलिनी भुकेच्या त्रासाने संत्रस्त होऊन क्रोधाने ती आपले वेढे सोडून सरळ होते आणि सुषुम्नामार्गाने सहस्त्रारात चंद्रमंडळाचा वेध घेते

आणि संपूर्ण शरीर अमृताने न्हाऊन जाते. ( कुंडलिनी जागृत झाल्यानंतर मणीपुर चक्रातील सूर्य ऊर्ध्वमुख होऊन त्याच्या प्रकाशात चंद्रमंडळ दिसू लागते व शीतल प्रकाशरूपी अमृत झरू लागते.)
**अथवा**:- " **पीयूष स्रवण हरण "** म्हणजे " जीवन शक्तिचा ह्रास " – श्वासाने जीवन शक्तिचा ह्रास होतो. कुंभक करून श्वास उच्छवास क्रिया रोखून धरली असता सूर्य , चंद्र म्हणजेच इडा आणि पिंगला ( डावी आणि उजवी नाकपुडी ) रोखून ठेवल्याने जीवन शक्तिचा ह्रास होत नाही याचाच अर्थ कुंडलिनी शक्ति अमृत ऊर्फ जीवन शक्तिचा ह्रास करण्यास असमर्थ झाल्याने जीवन शक्ति वृद्धिंगत होते, अमृतस्वरूप होते. आधुनिक शरीर शास्त्रानुसार शक्ति ( एनर्जी ) ची दोन प्रमुख कार्य आहेत एक चय (एनाबोलिक) आणि उपचय क्रिया (केटाबोलिक), चय क्रिया ही नवीन पेशींना जन्म देते तर उपचय क्रिया जुन्या पेशीचा त्यांचे कार्य/आयुष्य संपल्यावर त्यांचा नाश करते. आपण येथे चय क्रिया म्हणजे सृजनात्मक कार्य म्हणजे अमृत ऊर्फ चंद्र आणि उपचय क्रिया म्हणजे सूर्य असे म्हणू शकतो. प्राणायामाच्या द्वारे योगी चय आणि उपचय क्रिया थांबवितो आणि त्यावेळी शक्ति आपले रूप (कार्य) बदलते आणि सूक्ष्म स्तरावर कार्य करू लागते , चयापचय दोन्ही क्रिया थांबल्याने आयुष्य क्षीण होणे थांबून आयुष्य वर्धन होते. षट् चक्र निरूपण या विषयी शिवसंहिता पाचव्या पटलांत याचे विस्तृत वर्णन दिले आहे.

**[५]**

**पृथिव्यापस्तेजः पवनगगने तत्प्रकृतयः स्थितास्तन्मात्रास्ता विषयदशकं मानसमिति ।**
**ततो (तथा) माया विद्या तदनु च महेशः शिव इतः|परं तत्त्वातीतं मिलितवपुरिन्दोः परकला ॥ ५॥**

**सरळ अर्थ**:- पृथ्वी ,जल ,तेज ,वायु , आकाश आणि त्यांचे प्रकृती, रूप, तन्मात्रा दहा इंद्रिये मन आणि माया , विद्या , महेश आणि शिव या सगळ्यांच्या पलीकडे तत्वातीतात विलीन (तद्रूप) हे चंद्राची परकला तू उरतेस.

**व्याख्या**:- कुंडलिनी शक्तिच्या द्वारा चंद्रमंडळाचा वेध म्हणजे काय हे सांगितल्यावर आचार्य कुंडलिनी शक्तिचा तिच्या परा स्वरुपात लय कसा होतो याचे वर्णन करीत आहेत. विषयात प्रवेश करण्या पूर्वी तत्व म्हणजे काय याचे ज्ञान होणे आवश्यक आहे. शैव मतानुसार तत्व एकूण ३६ आहेत. प्रत्यभिज्ञा प्रमाणे ३६ तत्वे येणेप्रमाणे आहेत
**माया -** १) शिव २) शक्ति ३) सदाशिव – (मंत्र वा सदाख्य अथवा अर्धनारीश्वर) ४) ईश्वर (महेश्वर) ५) शुद्ध विद्या (मंत्र) ६) माया ७) कला ८) विद्या ९) राम १०) काळ ११) नियती १२) पुरुष १३) प्रकृति
**मानस:-** १४) बुद्धि १५) अहंकार १६) मन १७ ते २६ – दहा इंद्रिये { ५ ज्ञानेंद्रिये - [श्रोत्र, त्वचा,चक्षु रसना, नासिका] + ५ कर्मेंद्रिये – [वाक, पाणि, पाद, पायु, उपस्थ] } , २७ ते ३१ पांच तन्मात्रा (शब्द ,स्पर्श, रूप, रस, गंध ) आणि ३२ ते ३६ पंच महाभूते (पृथ्वी ,जल ,तेज ,वायु , आकाश)
मन बुद्धि अहंकार आणि चित्त ह्यांना अंत:करण चतुष्टय म्हणतात.



कुंडलिनी शक्ति ऊर्ध्वगामिनी होऊन सहस्त्रार चक्रात परमशिवात विलीन होणे या प्रक्रियेला लय-क्रम ( प्रतिप्रसव क्रम) आणि शक्ति परत मूलाधारात येण्याला सृष्टि-क्रम (प्रसवक्रम) म्हणतात. आचार्यश्री या ठिकाणी की जेव्हा शक्ति जागी होऊन ऊर्ध्वगामिनी होते तेव्हा क्रमाक्रमाने तत्वांचा लय होऊन शेवटी पराशक्ति भगवती आपल्या परम संवित रूपात विलीन होऊन परम शिवामध्ये समरस होते, हेच शक्तिचे आद्य स्वरूप (किंवा शरीर) आहे, हेच चंद्राचे कला रूप आहे ( चंद्रकला म्हणजे सोळा कला आणि सत्रावी कला म्हणजे अमृत तत्व असा अर्थ या ठिकाणी [पहिल्या श्लोकाप्रमाणे] घेता येईल ) लय-क्रम समजावून सांगतांना आचार्य तत्वांचा लय येणेप्रमाणे देतात.
पृथ्वी ,जल ,तेज ,पवन , आकाश - ५ तन्मात्रा - १० इंद्रिये – मानस (अंत:करण चतुष्टय ), माया , विद्या , महेश , शिव . परा संवित ( परम तत्व , परम शिव )

कुंडलिनी शक्ति जेव्हा चक्रांचा वेध करते तेव्हा क्रमशा: तत्वांचा लय होतो. मूलाधाराच्या वेधाने पृथ्वी तत्वाचा लय होतो, स्वाधीष्ठान चक्राच्या वेधाने जल तत्व , मणीपुर चक्राच्या वेधाने तेज अथवा अग्नि तत्व , हृदय अथवा अनाहत चक्राच्या वेधाने वायु तत्व तर विशुद्ध चक्राच्या वेधाने आकाश तत्वाचा लय होतो.

५ तन्मात्रा,१० इंद्रिये, बुद्धि आणि अहंकार या सगळ्यांचा संबंध मनाशी आहे त्यामुळे आज्ञा चक्राचा वेध झाल्यावर या सगळ्यांचा अहंकारात लय होतो कारण आज्ञाचक्रात मन असते ( “मनोपि भ्रुमध्ये “ ). आज्ञाचक्रा च्या वर कुंडलिनी शक्ति जेव्हा वेगवेगळ्या स्तरावर पोहोचते तेव्हा बाकी तत्वांचा लय होतो. आज्ञाचक्राच्या वर योगाच्या विभिन्न ग्रंथात ९ स्तर संगितले आहेत.
आचार्यश्री या ठिकाणी मानस म्हणजे अंत:करण चतुष्टय – मन बुद्धि अहंकार आणि चित्त या कडे संकेत करतात आणि मानस नंतर माया (म्हणजे शब्द प्रकृती पुरुष नियती काळ राम विद्या कला (माया) ही आठ तत्वे माया तत्वाच्या आधीन आहेत.
मायेनंतर क्रम विद्येचा येतो , विद्या म्हणजे शुद्ध विद्या असे आचार्य सांगतात , म्हणजे मायेचा लोप शुद्ध विद्येमध्ये होतो,शुद्ध विद्येचा लय महेश्वर म्हणजे ईश्वर तत्वात होतो, ईश्वर तत्वाचा लोप शिव अर्थात सदाशिव तत्वात होतो आणि मग सदाशिव तत्व परमतत्वात विलीन होते. असेही आपल्याला म्हणता येईल की आचार्यांच्या मतानुसार विद्या तत्व म्हणजे सदाशिव , ईश्वर आणि शुद्ध विद्या ही तीन तत्वे होत कारण ही तीनही तत्वे विद्या तत्वाच्या अंतर्गत मोडतात. महेश या शब्दाचा आचार्यांचा संकेत शिव आणि शक्ति तत्वाकडे आहे कारण हे दोन्ही शिव तत्वात अंतर्भूत आहेत तसेच शिव शब्दाचा अर्थ परमशिव असाही होऊ शकतो .या सगळ्या तत्वांच्या पलीकडे परा शक्ति आपल्या परा संवित रूपात समरस होते ( चंद्राच्या पर-कला म्हणजे सतरावी कला जे शक्तीचे वास्तविक रूप/शरीर आहे ). वाराहोपनिषद पाचव्या अध्यायात म्हटले आहे की

**प्रणवेन समुत्थाप्य श्रीबीजेन निवर्तयेत् ।**
**स्वात्मानं च श्रियं ध्यायेदमृतप्लावनं तथा ॥ ३४॥**

ॐकारापासुन श्री बीजापर्यंत श्रीविद्येची सतरा अक्षरे होतात ही सत्रावी कलाच पर-कला होय. चवथ्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे सहस्त्रार चक्र हे परमशिवाचे स्थान आहे आणि या संदर्भात वाराहोपनिषद पाचव्या अध्यायात म्हटले आहे की

**मूलाधारादिषट्चक्रं शक्तिस्थानमुदीरितम् ।**
**कण्ठादुपरि मूर्धान्तं शाम्भवं स्थानमुच्यते ॥ ५३॥**

चंद्राची पर-कला म्हणजे सतरावी कला असा शब्दप्रयोग करणे आता उचित ठरेल , याठिकाणी आचार्यांनी परम तत्वासहित २६ तत्वांचे वर्णन केले आहे. या संदर्भात सौभाग्यलक्ष्मुपनिषदा चा शेवटचा अध्याय वाचनीय आहे.

[६]

**कुमारी यन्मन्द्रं ध्वनति च ततो योषिदपरा कुलं त्यक्त्वा रौति स्फुटति च महाकालभुजगी ।
ततः पातिव्रत्यं भजति दहराकाशकमले सुखासीना योषा भवसि भवसीत्काररसिका ॥ ६॥**

**सरळ अर्थ**:- कुमारीरूपात जी कोमल अश्या स्वराने आवाज करते आणि मग परत एखाद्या सामान्य स्त्री प्रमाणे कुळाच्या रितीविरोधी वागून आरडाओरड करते , रडत असते. आणि मग ती महाकाल सर्पिणी जागृत होऊन अनाहत चक्रात ( हृदयाकाशात ) पतिव्रता धर्माचे गुणगान करते आणि भगवान शंकराच्या सीत्काराची रसिक होऊन जाते.

**व्याख्या**:- **यत्कुमारी मंद्रयते यद्योषितपतिव्रता | अरीष्टं यत्किंच क्रियते अग्निस्तद्नुवेधति ||**
तैत्तिरिय आरण्यकाच्या पहिल्या प्रपाठकातिल सत्ताविसाव्या अनुवाकामधील ही ऋचा घेतली आहे, या ऋचेच्या आधारावर सहावा श्लोक आचार्यांनी केला आहे. श्री लक्ष्मीधर त्यांच्या सौंदयलहरी वरील टीकेत अरुणोपनिषदातून ही ऋचा घेतली आहे. व्याख्या करतांना आचार्य म्हणतात,
कुंडलिनी शक्तिच्या तीन अवस्था आहेत – पहिल्या अवस्थेत ती कुमारिकेप्रमाणे मूलाधारात निद्रिस्त आहे. मंद स्वराने ती गुणगुणत असते. कुंडलिनी ही सापासारखी आहे आणि ती सापाप्रमाणे हळुवार असा फूत्कार करते.
दुसऱ्या अवस्थेत ती युवती सदृश असते. कुंडलिनी शक्ति जागी होऊन मूलाधारतून विष्णुग्रंथी पर्यन्त म्हणजे हृदयाकाशात जाईपर्यंत ती युवावस्थेत असते. या अवस्थेत आपल्या कुल मर्यादा सोडून ती सासरी जाणाऱ्या वधू प्रमाणे आकांत करते. आणि तिसऱ्या अवस्थेत सहस्त्रार कमळात शिवाला भेटल्यावर ती एखाद्या पतिव्रतेप्रमाणे वागते.
"**अरीष्टं यत्किंच क्रियते "** याचा अर्थ श्री लक्ष्मीधर ह्यांनी "अमृत चाखते" असा घेतला आहे. अरिष्ट चा अर्थ सूतिकागृह असाही होतो म्हणून सदर ऋचेचा अर्थ , मग ती सुतिकागृह करते म्हणजे पतिव्रता झाल्यावर ती गर्भवती होते आणि मातृपद प्राप्त करते ( माता होते ) किंवा असे म्हणता येईल की कुंडलिनी आपल्या अंतिम ध्येयाप्रत पोहोचते. या अवस्थेत साधकाला ब्रह्मज्ञान होते.
**" अग्निस्तद्नुवेधति** " – स्वाधिष्ठानचक्रातील अग्नीचा वेध.

स्वाधिष्ठानचक्राचा वेध झाल्यावर कुंडलिनी ऊर्ध्वगामिनी होते आणि ती सहस्त्रार चक्रात अमृत पान करते. इथे असे म्हणता येईल की जश्या स्त्री च्या तीन अवस्था असतात , कुमारी युवती आणि पतीव्रता त्याचप्रमाणे कुंडलींनीच्याही तीन अवस्था असतात. कुमारी अवस्थेतील स्त्रीला जशी जशी समज येऊ लागते व ती भविष्यातील लग्न करणे व तद्विषयी इतर विचार करू लागते ,स्वप्नरंजन करू लागते परंतु आपले विचार/इच्छा ती व्यक्त करीत नाही. (यालाच आपण मंद ध्वनि/ किंवा मनाशीच गुणगुणणे म्हणू ).
युवती अथवा तरुणी अवस्थेत स्त्री विवाह झाल्यावर माहेर सोडून जात असता ती शोकाकुल होऊन रडते व मार्गात अनेकानेक विचार करीत जाते आणि सासरी ( पतिगृहात ) गेल्यावर गृहस्वामिनी बनून पतिशी एकरूप होऊन पातिव्रता होते.
कुंडलिनी शक्ति सुद्धा अशाच तीन अवस्थांनी आपल्यासमोर प्रकट होते. कुमारी स्वरुपात ती आपल्या कुलगृही (माहेरी) म्हणजे मूलाधार चक्रात मनाशीच गुणगुणत असते (मंद ध्वनि) मंद म्हणजेच ऐकु न येणारा किंवा
परा वाणी याचाच अर्थ कुंडलिनी मूलाधारात परा वाक रूपी असते.

युवती अथवा तरुणी अवस्थेत कुंडलिनी मूलाधार चक्र सोडून सहस्त्रार चक्राकडे जात असता, आपले कुल सोडून जात असता रडते , आरडाओरड करते.
हृदयकमळात आल्यानंतर पतीव्रता धर्माचे आचरण करून भगवान शंकराशी एकरूप होऊन त्या आनंदात ती रममाण होते. मग सहस्त्रार अर्थात पतिगृही आल्यावर ती पूर्णता: पतिव्रता होऊन परम शिवात विलीन होते.
हे शिव आणि शक्तिचे सामरस्य होय. हृदयाकाश हा तिचा मधला आरामाचा टप्पाच जणू असतो.
इथे असे म्हणता येईल की कुंडलिनी शक्ति मूलाधारात असते तेव्हा परावाक रूपी असते या ठिकाणी नाद सूक्ष्म असतो (अत्यंत मंद असा की कानाला ऐकू येणार नाही) . मूलाधारापासून अनाहत / हृदय चक्रापर्यंत पश्यन्ति अथवा वैखरी वाणीची अवस्था असते, वैखरी रूपात नादाचा विस्फोट होतो आणि सहस्त्रार चक्रात जाऊन महाकारण बिंदु मध्ये विलीन होते. नादाचा स्त्रोत सहस्त्रार चक्र आहे. तैत्तिरिय आरण्यकाच्या पहिल्या प्रपाठकातिल अकराव्या अनुवाकात म्हटले आहे की.

**हसितं रुदितं गीतं वीण पणव लसितम् मृतं जीवं च यत्किन्चित् अङ्गानि स्नेव विद्धि तत् |**

शक्तिपात झाल्यानंतर कुंडलिनी जागृत होईपर्यंत साधकाला वेगवेगळ्या प्रकारच्या क्रिया होतात, रडणे , ओरडणे, गाणे आदी क्रियाही होतात , हेच कुंडलिनी शक्तिचे रडणे ओरडणे होय.
हृदय चक्रात जेव्हा साधकाचे ध्यान लागते तेव्हा आत्म दर्शन घडते आणि साधक आनंदात मग्न होतो म्हणजेच भगवती कुंडलिनीचे ( आत्मा = शंकर ) सुखाने आत्म्याच्या आनंद ध्वनि ( सित्कार ) चा रसिकतेने आस्वाद घेणे होय. अथवा अनाहत चक्राचा वेध झाल्यावर साधकाच्या साधनात दृढता येते आणि साधकाचे मन ब्रह्मानंदात निमग्न होते. साधकाचे मन अनाहाताचा / हृदय चक्राचा वेध झाल्यावर जेव्हा ब्रह्मानंदाचा आनंद मिळतो तो आनंद परत परत मिळावा असे त्याला वाटत राहाते. जसे पतीशी रममाण झाल्यावर त्या सुखाची स्त्री आतुरतेने तोच आनंद परत परत मिळावा याची उत्कटतेने वाट पहाते. तश्याच प्रकारे भगवती महाशक्ति कुंडलिनी ब्रह्मा मध्ये लीन होण्याचा जो आनंद आहे त्यासाठी आतूर होते.
जेव्हा अनाहत चक्राचा वेध होऊन सूर्य ऊर्ध्वमुख होतो आणि त्याचा प्रकाश चंद्रमंडलावर पडतो आणि (परावर्तीत प्रकाश = शीतल प्रकाश ) अमृताचा प्रवाह सुरू होतो आणि कुंडलिनी शक्ति ह्या अमृताची रसिक होते. ( ह्या शीतल अमृताची आतुरतेने वाट पहात रहाते )
जसे

**शिवार्कमण्डलं भित्वा द्रायवन्तीन्दु मण्डलम् |**
**तदुद्भुतामृतस्यन्दि परमानन्द नन्दिता |**
**कुलयोषित कुलं त्यक्त्वा परं वर्षण मेत्य सा ||**
**(भैरवयामले वामकेश्वर् महातन्त्रे बहुरुपाष्टक विद्यायां कथितम)**

सहस्त्रार चक्रात पोहोचल्यावर महाशक्ति जशी एखादी पतिव्रता आपल्या पतीच्या घरी सुखाने रहाते त्याप्रमाणे किंवा कुंडलिनी सहस्त्रार चक्रात पोहोचल्यानंतर सगळ्या क्रिया बंद होतात आणि मनाचा निर्विकल्प समाधी मध्ये लय होतो.
शक्तिपाताचे तीन प्रकार आहेत – मंद , तीव्र आणि तीव्रतर - हीच कुंडलिनीची कुमारी युवती आणि प्रौढा तीन रुपे आहेत असे म्हणता येते.
मंद शक्तिपात झाल्यास साधक शनैः शनैः म्हणजे हळूहळू प्रगती करतो आणि क्रमाक्रमाने चक्रांचे भेदन होते.
तीव्र शक्तिपात झाल्यावर शक्ति जागृत होउन अनाहत / हृदय चक्राचा भेद होउन साधक साधन परायण होतो. साधकाचे सगळे संशय नष्ट होतातआणि ब्रह्मप्राप्ति साठी आतुरतेने साधन करु लागतो.

तीव्रतर शक्तिपातात साधकाला तत्क्षणीच ब्रह्मज्ञान होते , ही शांभवी दीक्षा होय या ठिकाणी शक्ति एकदम सहस्त्रार चक्रात जाऊन परम शिवा मध्ये लीन होते / लय पावते.

[७]

**त्रिकोणं ते कौलाः कुलगृहमिति प्राहुरपरे चतुष्कोणं प्राहुः समयिन इमे बैंदवमिति ।**
**सुधासिन्धौ तस्मिन्सुरमणिगृहे सूर्यशशिनो-रगम्ये रश्मीनां समयसहिते त्वं *विहरसे ॥ ७॥**
पाठभेद – विहरसि

**सरळ अर्थ:-** हे भगवती , दुसरे ( कौलमतवादी ) त्रिकोणालाच तुझे वास्तव्य मानतात आणि आम्ही समयाचार मार्गाचा अवलंब करणारे चौकोन म्हणजे बैंदव स्थान हे तुझे कुलगृह मानतो जे अमृताच्या सागरात आहे आणि दिव्य रत्नांनी बनलेले तुझे गृह सूर्य आणि चंद्रालाही गूढ असे आहे आणि ह्या ठिकाणी तू शिवासह विहार करतेस.

कौलमार्गनुयायी त्रिकोणांतर्गत जो बिंदु आहे त्याला भगवतीचे स्थान मानतात आणि समयाचार मार्गाचा अवलंब करणारे चौकोनाच्या मध्ये असलेल्या बिंदुला तुझे कुलगृह मानतो.या ठिकाणी श्री चक्राचे ज्ञान आवश्यक आहेयासाठी श्रीचक्राचे चित्र दिलेले आहे
.

श्रीचक्र



सृष्टियोगेन चक्रमिदम

कौल मतानुसार श्री चक्रामध्ये ९ त्रिकोण असतात ज्यांना ९ योनि असे म्हणतात. या ९ त्रिकोणातील ५ शक्ति त्रिकोण खाली मुख करून असतात तर ४ ऊर्ध्वमुख त्रिकोण शिव त्रिकोण मानले जातात, सदर वर्णन हे सृष्टी क्रमानुसार आहेत तर संहार क्रमामध्ये शक्ति त्रिकोण हे ऊर्ध्वमुखी तर शक्ति त्रिकोण अधोमुखी असतात. समय मतानुसार श्रीचक्राच्या ९ योनि येणेप्रमाणे आहेत.

**मध्य त्रिकोण २) अष्टार ३) अंतर्दशार ४) बहिर्दशार ५) चतुर्दशार ६) अष्टदल पद्म ७) षोडशदल पद्म ८) तीन वृत्त ९) भू पुर**

यातील १ ते ५ शक्ति-चक्र आणि ६ ते ९ शिव चक्र समजले जातात यानुसार भू पुर (चौकोनात) जे वृत्त (वर्तुळ) आहे (तीन वृत्त , षोडशदल पद्म आणि अष्टदल पद्म) तेच बिंदु स्थान आहे आणि त्याच्या मधोमध शक्तिचे स्थान आहे, म्हणजे शक्ति ही चक्रात असते.
षोडशदल पद्म चंद्राचे प्रातींनिधिक आहे.चंद्राचे स्थान सहस्त्रार म्हणजे चतुष्कोण सहस्त्रार होईल आणि त्यामध्ये षोडशदल पद्म हे चंद्रमंडल आहे जे अमृताचा सागर आहे, या सुधासागरात महामाया कुंडलिनी वास करते / रहाते.
कौल मतानुसार मूलाधारचक्रात जे योनिस्थान आहे म्हणजे त्रिकोण आहे तेच भगवती कुंडलिनी शक्तिचे स्थान आहे. म्हणून कौल मार्गी मूलाधारातच शक्तिची पूजा करतात.
या श्लोकातून आचार्य समय मार्गाचा प्रसार करतात आणि कौल मार्गाचे खंडण करतात.कौल संप्रदायात मूलाधार चक्रात शक्तिची पूजा तसेच ध्यान केले जाते जे त्याज्य आहे.समय मार्गाच्या साधकांनी शक्तिचे ध्यान सहस्त्रार चक्रात केले पाहिजे, या बद्दल पुढे केले जाईल. या श्लोकात आचार्यभगवतीच्या निवास स्थानाबद्दल वर्णन करतांना सांगतात की हे भगवती समय मार्गाच्या अनुसार सहस्त्रार चक्रात (चतुष्कोण) मध्यभागी चंद्रमंडलातील अमृताच्या सागरात आहे आणि दिव्य अश्या रत्नांनी घडविले आहे.
आद्य शंकराचार्य लिहितात की

**कल्लोलोल्लसितताभृताब्धिलहरीमध्ये विराजन्मणिद्वीपे**
**कल्पकवाटिकापरिवृते कादम्बवाट्युज्वले।**
**रत्नस्तंभसहस्रनिर्मितसभामध्ये विमानोतमे**
**चिन्तारत्नविनिर्मितं जननि ते सिंहासनं भावये॥** श्री मन्त्र मातृका पुष्प माला

वामकेश्वर महातंत्रातही म्हटले आहे की

**बिंदु स्थानं सुधा सिन्धुः पञ्चयोन्याः सुर द्रुमः |**
**तत्रैव नीप श्रेणी च तन्मध्ये मणिमण्डपम ||**
**तत्र चिन्तामणिकृतं देव्या मन्दिरमुत्तमम |**
**शिवात्मके महामन्चे महेशानोपबर्हणे ||**
**सुधा सिन्धुमध्ये मणीद्विपे रम्ये सुकल्पद्रूमाकल्पकाडदंबसंत्रे |**
**स्फुरतस्वर्ण सिंहासने रत्नपीठे भवाङ्के निषण्णां भजाम्यन्तपूर्णां ||**

भगवतीचे हे स्थान सूर्य आणि चंद्र दोघां च्या प्रकाशालाही अगम्य आहे कारण हे स्थान सूर्य आणि चंद्र या दोन्ही भागांच्या वर आहे.कुंडलिनी ही चार भागात विभागली गेली आहे – अग्नी , सूर्य , सोम (चंद्र), आणि परा कुंडलिनी , त्याचप्रकारे श्रीविद्या ( षोडशी ) चे ही चार भाग आहेत, अग्नी , सूर्य , सोम (चंद्र), आणि पराखंड. आदया शक्ति श्री भगवती चे निवासस्थान अग्नि, सूर्य , सोम ह्यांच्या पलीकडे परा हा चौथा खंड

आहे जो बैंदव स्थानाचा मध्य भाग म्हणजे महाबिंदु स्थान आहे,असेही म्हणता येइल कि षोडशी विद्येचा मुख्य भाग हे तिचे अन्तिम कुट आहे. खाली दिलेल्या सारणीने अधिक स्पष्ट होते.

अध: कुण्डली -------- अग्नि खण्ड -------- वाग्भव कुट
मध्य कुण्डली -------- सूर्य खण्ड -------- कामराज कुट
उर्ध्व कुण्डली -------- सोम खण्ड -------- शक्ति कुट

परा कुण्डली --- परा खण्ड --- तुर्य कुट --- भगवतीचे निवासस्थान.
या शेवटच्या स्थानावर पोहोचून शक्ति शिवा बरोबर लीन होते आणि विहार करु लागते .
इथे असे म्हणता येते कि सहस्त्रार स्थानापर्यंत फक्त सुषुम्ना मार्गानेच जाता येते म्हणून हे स्थान सूर्य , चंद्र ( इडा आणि पिंगला ) यांच्या किरणांना ही अगम्य आहे.

[८]

**त्रिखण्डं ते चक्रं शुचिरविशशाङ्कात्मकतया मयूखैः *षट्त्रिंशद्दशयुततया खण्डकलितैः ।**
**(पाठभेद) षट्त्रिंशत्त्रिशतयुतमाखण्ड , षट्त्रिंशच्छतयुततया**
**पृथिव्यादौ तत्त्वे पृथगुदितवद्भिः परिवृतं *भवेन्मूलाधारात्प्रभृति तव षट्चक्रसदनम् ॥ ८॥**
**(पाठभेद) भवेन्मूलाधारप्रभृति**

[९]

शतं चाष्टौ वह्नेः शतमपि कलाः षोडश रवेः
शतं *षट् च त्रिंशत्सितमयमयूखाश्चरणजाः । (पाठभेद) षट्त्रिंशद्द्वे, षट्त्रिंशद्वै सितमयि
य एते षष्टिश्च त्रिशतमभवंस्त्वच्चरणजा* (पाठभेद) चरणगा
*महाकौलेस्तस्मान्न हि तव शिवे कालकलना ॥ ९॥ (पाठभेद) महाकालस्तस्मात्

**सरल अर्थ:- (८)** - हे भगवती तुझे चक्र ( श्री चक्र , निवासस्थान अथवा नगर ) हे अग्नी , सूर्य आणि चंद्र अश्या तीन भागांनी बनलेले ३६० किरणांनी युक्त असे आहे , ही ३६० किरणे वेगवेगळी पृथ्वी आदी तत्वांनी बनलेली आहेत आणि ती किरणे तुला आवृत्त करतात ( अधिक प्रकाशमान करतात ), अश्याप्रकारे मूलाधारादी सहा चक्रांनी तुझे घर बनले आहे.

**सरल अर्थ:- (९)** – अग्निची १०८ , सूर्याची ११६ आणि चंद्राची १३६ किरणरूपी कला तुझ्या चरणांपासून उत्पन्न झालेली ३६० किरणे आहेत ( तुझे चरण रज आहेत ) म्हणून हे महाशिवे , कौल मार्गानुयायी आचार्य
(महा कौल) तुझ्या काळाची कल्पना सुद्धा करू शकत नाहीत. ( पाठभेदांनुसार – महाकाल स्वतः तुझ्या काळाची कल्पना करू शकत नाही अशी तू महाकालातीता आहेस.

**व्याख्या :-** सदर दोन श्लोकात आचार्य विशद करतात की मुलाधारादी सहा चक्रांचा मार्ग हा सुषुम्ना मार्गच आहे.
हे भगवती तुझे चक्र हे श्रीचक्र आहे, आणि अश्याप्रकारे शरीर हेच श्रीचक्र आहे असे सांगत आहेत आणि समयाचार मार्गीयांना बाह्य पूजा गौण अथवा निषिद्ध आहे असे सांगतात कारण समयाचारींसाठी सुषुम्ना मार्ग हेच श्रीचक्र आहे.
श्रीचक्राचे तीन भाग आहेत – अग्नी , सूर्य आणि चंद्रखंड

जसे

**अग्निषोमात्मकम चक्रमग्निषोम मयं जगत**
**अग्नावन्तर्बभौ भानुरग्निषोम मयं स्मृत**
**त्रिखण्डं मातृका चक्रं सोम सुर्यानलात्मकं ||**

सुषुम्ने अंतर्गत कुण्डलिनीचे तीन भाग खाली दर्शविल्याप्रमाणे आहेत
अग्नि खण्ड --- मूलाधार आणि स्वाधिष्ठान .
सूर्य खण्ड --- मणिपुर आणि (अनाहत) हृदय .
सोम खण्ड --- विशुद्ध आणि आज्ञा .

या तीन भागांचे मिळून ३६० किरणे होतात आणि या किरणांनी संपूर्ण चक्र आच्छादित आहे.
**अग्नि खंडातील १०८ किरणे येणेप्रमाणे**
मूलाधारात पृथ्वीची ५६ किरण ---- ५ महाभूत , ५ तन्मात्ला , ५ ज्ञानेंद्रिये , ४ अंतःकरण चतुष्टय , १ कला , १ प्रकृती , १ महत , १ पुरुष एकूण २८ आणि शिव आणि शक्ति या भेदाने दुप्पट म्हणजे ५६ .
स्वाधिष्ठानात जल तत्वाची ५२ किरण ----- ५ महाभूत , ५ कर्मेंद्रिये , ५ ज्ञानेंद्रिये , १० इंद्रियांची कार्ये , १ मन , एकुण २६ , आणि शिव आणि शक्ति या भेदाने दुप्पट म्हणजे ५२.

**सूर्य खंडाचे ११६ किरण येणेप्रमाणे**
मणीपुरात अग्निची ६२ किरणे ---- ५ महाभूत , ५ तन्मात्ला ५ कर्मेंद्रिये , ५ ज्ञानेंद्रिये , १० इंद्रियांची कार्ये १ मन , एकूण ३१ आणि शिव आणि शक्ति या भेदाने दुप्पट म्हणजे ६२.
हृदय चक्रात वायूची ५४ किरणे ---- ५ महाभूत , ५ तन्मात्ला , ५ ज्ञानेंद्रिये , , ५ कर्मेंद्रिये , ४ अंतःकरण चतुष्टय , १ कला , १ प्रकृती , १ पुरुष आणि शिव आणि शक्ति या भेदाने दुप्पट म्हणजे ५४.

**चंद्र खंडाचे १३६ किरण येणेप्रमाणे**

विशुद्ध चक्रात आकाश तत्वाचे ७२ किरण (३६ तत्व शिव आणि शक्ति या भेदाने दुप्पट म्हणजे ७२) तसेच आज्ञा चक्राचे ६४ , शिव शक्ति सदाख्य आणि महेश्वर सोडून (म्हणजे ७२ - ८ = ६४) शिव आणि शक्ति या भेदाने दुप्पट म्हणजे ६४.
ही सर्व किरणे भगवतीच्या चरण रज पासून उत्पन्न झाली आहेत . भगवती महाशक्ति या सगळ्यांच्या वर बैंदव स्थानी म्हणजे सहस्त्रार चक्रात विराजित असते म्हणून त्या खाली असलेली सगळी स्थाने जणू काही भगवतीचे चरण रज आहेत.
या ३६० किरणांची नावे सौंदर्यलहरीच्या सौभाग्यवर्धिनी टीकेच्या १४ व्या श्लोकाच्या विवरणात दिलेली आहेत. माझे परमपूज्य श्रीगुरूदेव स्वामी श्री विष्णुतीर्थ जी महाराजांनी सौंदर्यलहरीच्या टीकेत किरणांची नावे दिली आहेत.
भगवतीच्या या चक्राला संवत्सरात्मक चक्र सुद्धा म्हणता येइल.
एका संवत्सरात ३६० दिवसरुपि किरण असतात आणि संवत्सर हे सहा ऋतुमध्ये विभागले आहे, या विषयावर माझे परमपूज्य श्रीगुरूदेव स्वामी श्री विष्णुतीर्थ जी महाराजांनी सौंदर्यलहरीच्या टीकेत पान नं. १२९ वर लिहिले आहे की सहा चक्र आणि सहा ऋतु ह्यांच्यात समानता आहे. वसंत ऋतुची तुलना मूलाधाराशी करता येते कारण या ऋतुत पृथ्वी तत्व विकसित होऊन फुले आणि सुगंध मिळतो. ग्रीष्म ऋतूची तुलना स्वाधिष्ठान चक्राशी होते आणि या ऋतुत जल तत्वाचा वेध होऊन ते सुकू लागते. वर्षा ऋतुची समानता मणीपुर चक्राशी होते या ऋतुत अग्नी चा वेध होऊन वीज आणि पाऊस पडतो. शरद ऋतुचे साम्य अनाहत चक्राशी आहे या ऋतुत वायुचा वेध होऊन वातावरण शांत आणि निर्मळ होते , हेमंत ऋतुचे साम्य विशुद्ध चक्राशी आहे या ऋतुत आकाश तत्वाचा वेध होऊन थंडी पडते आणि

शिशिर ऋतूचे साम्य आज्ञा चक्राशी आहे या ठिकाणी चित्ताची प्रसन्नता वाढीस लागते. अश्याप्रकारे ३६० किरण आणि वर्षाच्या ३६० दिवसांची समानता हे दर्शविते की पिंडाचे संवत्सर हे आधार आहे.
कृष्ण आणि शुक्ल पक्ष हे शक्ति आणि शिवात्मक समजावे, कृष्ण पक्षात चंद्राला अन्वय आणि शुक्ल पक्षात उन्नेय भूमिकेत तसेच उत्तरायण आणि दक्षिणायन यात सूर्याची अन्वय आणि उन्नेय भूमिका समजावी.
कौल मार्गाचे अनुयायी मूलाधार चक्रात भगवतीची पूजा करतात म्हणून हे भगवती तुझ्या या चक्राची त्यांना कल्पनाही नाही आणि तुझ्या कालाचीही (संवत्सरात्मक ) ते कल्पना करू शकत नाही. संवत्सर हेअग्नि , सूर्य आणि सोमात्मक असते, दिवस सूर्याप्रमाणे तर रात्र सोम / चंद्राप्रमाणे आणि संध्यासमय ( संध्याकाळ ) ही अग्निप्रमाणे आहे. या ठिकाणी असे म्हणता येईल की ब्रह्मांड हे श्रीचक्र आहे म्हणजेच श्रीचक्र ब्रह्मांडाचे प्रतीक आहे आणि आपले शरीर हे श्रीचक्र आहे कारण " पिंडी ते ब्रह्मांडी "

**महात्म्यमत्र रश्मीनां यामले भैरवाभिदे रहस्यमनुप्रुच्छन्तै पार्वत्यै शम्भुनोदितम् ||**
**साधु – साधु महाभागे पृष्टं त्रैलोक्यसुन्दरि गुह्यातगुह्यतमं ज्ञानं न कुत्रापि प्रकाशितम ||**
**कला विद्या पराशक्ति: श्रीचक्राकाररूपिणी तन्मन्ध्ये बैंदव स्थानम् तत्रास्ते परमेश्वरी॥**
**सदाशिवेन संयुक्ता सर्वतत्त्वानिगामिनी चक्रम् त्रिपुरसुन्दर्याम् ब्रह्माण्डाकारमोश्वरि॥**
**पन्चभूतात्मकम् चेव तन्मात्रात्मकमेव च इन्द्रियात्मकमेव च मनस्तत्त्वात्मकम् तथा॥**
**मयादितत्त्वरूपम् च तत्त्वातीतम् तु बैंदवम् बैन्दवे जगदुत्पत्तिस्थितिसम्हारकारिणी॥**
**सदाशिवेन संपृक्ता तत्त्वातिता महेश्वरी ज्योतीरूपा निराकारा यस्या देहोद्भवा: शिवे ॥**
**किरणाश्च सहस्त्रं च द्विसहस्त्रम च लक्षकम कोटिरर्बुदमेवैषां परा संख्या न विद्यते ||**
**तामेवानुप्रविश्यैव भाति विश्वम् चराचरं यस्या भाषा महेशानि सर्वं विश्वम् विभासते ||**
**तद्भासा रहितं किञ्चिन्न च यच्च प्रकाशते तस्याश्च शिवशक्तेश्च चिदरुपायाश्वितं विना ||**
**आन्धमापद्यते नूनं जगदेतच्चचराचरम तेषामनन्तकोटीनां मयुखानां महेश्वरि ||**
**मध्ये षट्युत्तरं देवि त्रिशतं किरणा शिवे ब्रह्माण्डं व्यश्नुवानास्ते सोमसुर्यानिलात्मना ||**
**अग्नेरष्टोत्तरशतं षोडशोत्तरकं रवे षट्त्रिंशदुत्तरशतं चन्द्रस्य किरणा शिवे ||**
**ब्रह्माण्डं भासयन्तस्ते पिण्डांडमपि शाङ्करी दिवा सुर्यस्तथा रात्रौ सोमो वन्हिश्च संध्ययो ||**
**प्रकाशयन्त: कालांस्ते तस्मात्कालात्मात्रस्त्रय: षष्टुत्तरं च त्रिशतं दिन्यान्नेव तु हायने ||**

--- भैरवयामले चन्द्रज्ञान विद्यायां

**पृश्नयो नाम मुनयः सर्वे चक्रमुपाश्रिताः | सेवमानाश्चक्रविद्या देवगन्धर्व पूजितां ||**
**अग्निषोमात्मकं चक्रमग्निषोममयं जगत् | अग्नाबन्तर्बभौ भानुरग्निषोममयं स्मृतं ||**
**त्रिखण्डं मातृकाचक्रं सोमसुर्यानलात्मकं | महालक्ष्म्याः पुरं चक्रं तत्रैवास्ते सदाशिवः ||**

----- रुद्रयामले

**चतुर्भिः शिवश्चक्रैश्च शक्तिचक्रैश्च पञ्चभी: नव चक्रैश्च संसिद्धं शिवयोर्वपु**
(पाठभेद शिवरुपेश्च – शक्तिरुपैश्च)
**त्रिकोणं अष्टकोणं च दशकोणद्वयं तथा चतुर्दशारं चैतानि शक्ति चक्राणि पञ्च च ||**
**बिंदुश्चाष्टदलं पद्मं पद्मं षोडश पत्रकं चतुरश्रं च चत्वारि शिव चक्राण्यनुक्रमात् ||**
**त्रिकोणे बैन्दवं श्लिष्टमष्टारेअष्टदलांबुजं दशारयो: षोडशारं भुगृहं भुवनाश्रके ||**
**शैवानामपि शाक्तानां चक्राणां च परस्परं अविनाभावसंबन्धं यो जानाति स चक्रवित ||**
**त्रिकोणमष्टकोणं च दशकोणं द्वयम् तथा मनुकोणं च चतुष्कोणं कोणचक्राणि षट् क्रमात||**
**मूलाधारं तथा स्वाधिष्ठानं च मणिपुरकं अनाहतं विशुद्धाख्यमाज्ञाचक्रं विदुर्बुधा: ||**
**नवाधार स्वरुपाणी कोणचक्राणि पार्वति त्रिकोणरुपिणी शक्तिर्बिन्दुरुप: शिव: स्वयम् |**
**अविनाभावसंबन्धस्तस्माद्बिन्दुत्रिकोणयो: ||**

किंवा असेही म्हणता येइल कि हे श्रीचक्र सुर्यात्मक , सोमात्मक आणि अनलात्मक आहे.
श्रीचक्रात ४३ त्रिकोण , सूर्याच्या १२ कला , १२ नित्या , १२ राशी , ३ वेद आणि ४ स्वर यांची बेरीजही ४३ असल्याने श्रीचक्र सुर्यात्मक आहे.चंद्राच्या १६ कला आणि२७ नक्षत्र यांची बेरीज ४३ होते म्हणून श्रीचक्र सोमात्मक आहे. त्रिकोण हे अग्निचे स्थान आहे आणि त्याच्या मध्यभागी विराजित बिंदु हा अग्नी आहे. अष्टार अष्टमूर्ति आठ प्रकारच्या अग्नीचे द्योतक आहे आणि चतुर्दशार १४ भुवने दर्शवितो या प्रकारे त्रिकोण अनालात्मक आहे.

**[१०]**

**त्रिकोणं चाधारं *त्रिपुरतनु तेऽष्टारमनघे ।** --- *पाठभेद(त्रिभुवननुते, त्रिभुवननुतेष्टार)
***भवेत्स्वाधिष्ठानं पुनरपि दशारं मणिपुरम् ।** *पाठभेद (तव स्वाधिष्ठानं भगवति)
**दशारं ते संवित्कमलमथ मन्वश्रकमुमे विशुद्धं स्यादाज्ञा शिव इति ततो बैंदवगृहम् ॥ १०॥**

**सरळ अर्थ : -** (श्रीचक्राच्या मध्यातील) त्रिकोण हा मूलाधार होय आणि हे निष्पाप सुंदरी ! महात्रिपुरा ( त्रिपुर , त्रिखंडात्मक , तीन पुरे असलेले जिचे शरीर आहे) श्रीचक्राचा अष्टार म्हणजे स्वाधीष्ठान चक्र आहे आणि अंतर्दशार मणीपुर चक्र आहे तर बाहयदशार अनाहत (हृदय) चक्र आहे, हे उमे चतुर्दशार हे विशुद्ध चक्र आहे आणि आज्ञा चक्र हे शिवाचे स्थान , शिव चक्र अथवा बैंदव स्थान आहे.

**व्याख्या :-** सूर्य अग्नी आणि सोम ह्यांचे षटचक्रा बरोबर वा प्रकृती आणि संवत्सराशी ऐक्य / समानता दाखवून आचार्य श्रीचक्रांतर्गत विभिन्न चक्रा सोबत ऐक्य दाखवीत आहेत.
सातव्या श्लोकात सांगितल्यानुसार श्रीचक्र हे नवयोन्यात्मक आहे त्या नऊ योनि अथवा चक्र खाली दिल्याप्रमाणे आहेत.
१ – त्रिकोण २ – अष्टार ३ – अंतर्दशार ४ – बहिर्दशार ५ – चतुर्दशार ६ – अष्टदल पद्म ७ – षोडशदल पद्म ८ – तीन वृत्त (वर्तुळ) ९ – भू – पुर
वर वर्णन केलेल्या चक्रांपैकी प्रथम पांच ही शक्ति चक्रे आहेत आणि बाहेरच्या भागातील उरलेली चार चक्रे ही शिव चक्रे होत आणि यातील चौकोन (चतुष्कोण) भुपुरे सहस्त्रार चक्र आहेत आणि तीन वृत्त (वर्तुळ) बैंदव स्थाने आहेत.
या श्लोकात आचार्य श्रीचक्राची शरीरातील भावात्मक समानता दाखवीत आहेत. पहिली पांच शक्तिची चक्रे क्रमश:
मूलाधार , स्वाधिष्टान , मणीपुर , अनाहत आणि विशुद्ध चक्र होय आणि आज्ञा व त्याही वरचे स्थान शिव चक्र आहे. शिव चक्रांपैकी पहिली दोन चक्र म्हणजे अष्टदल आणि षोडशदल चंद्राचे द्योतक आहेत आणि आज्ञा चक्र हे चंद्राचे स्थान आहे. षोडशदल पद्माच्या सोळा पाकळ्या या चंद्राच्या सोळा कला दर्शवितात. आज्ञाचक्र व त्यावरील स्थाने चंद्राची मानली जातात. भुपूर हे सहस्त्रार होय आणि तीन वृत्त बैंदव म्हणजे सहस्त्रारस्थ चंद्राचे स्थान आहे जे चंद्राची अमृत कला अथवा सत्रावी कला होय.
याप्रकारे आचार्यश्री सांगतात की समय मार्गी साधकांसाठी सुषुम्नामार्ग हेच श्रीचक्र आणि या श्रीचक्राची अंतर्भावना पूर्वक पूजा केली पाहिजे म्हणजे मानसपूजा केली पाहिजे.ज्या साधकाने देहातील श्रीचक्राला जाणले त्याला बाह्य पूजेची आवश्यकता नाही आणि हाच समय मार्गाचा मूलमंत्र आहे. जसे म्हटले आहे की,

**" सुषुम्ना तिसृषू श्रेष्ठा वैष्णवी मुक्तिमार्गदा "**

**त्रिकोणे ते वृत्तत्रितयमिभकोणे वसुदलं ।**
**कलाश्रं मिश्रारे भवति भुवनाश्रे *च भुवनम् । (*पाठभेद – त्रिभुवनम्)**
**चतुश्चक्रं शैवं निवसति *भगे शाक्तिकमुमे । (*पाठभेद – दशे)**
**प्रधानैक्यं षोढा भवति च तयोः शक्तिशिवयोः ॥ ११॥**

**सरळ अर्थ:-** त्रिकोण हा तीन वृत्त आहे आणि इभ कोन अष्टार होय जो अष्टदल पद्म आहे , षोडशदल पद्म जोड पद्म आहे आणि भुपूर चतुर्दशार आहे . याप्रकारे या चार शिवचक्रात हे उमा पांच शक्ति योनि अर्थात चक्र वास करतात शक्ति आणि शिवाचे प्रमुख ऐक्याने त्याचे सहा प्रकार होतात.
**कठीण शब्दार्थ –**
**इभ कोणे** -- इभ याचा अर्थ हत्ती होतो आचार्य या ठिकाणी स्पष्ट संकेत देतात की हत्ती याचा माततार्थ दिग्गज म्हणजेच आठ संख्या अशा अर्थाने इथे प्रयोग होतो आणि इभ कोण याचा अर्थ अष्टार होतो.
**वसुदलं --** वसु हे आठ असतात आणि या ठिकाणी हा शब्द संख्या सूचक म्हणजे वसुदल याचा अर्थ अष्टदल पद्म असा होतो.
**कलाश्रं –** कला सोळा असतात म्हणजेच या ठिकाणी हा शब्द संख्या सूचक म्हणजे कलाश्रं याचा अर्थ षोडश दल पद्म असा होतो.
**भुवनाश्रे –** भुवन चौदा असतात म्हणजेच या ठिकाणी हा शब्द संख्या सूचक म्हणजे भुवनाश्रे याचा अर्थ चतुर्दशार होतो.
**भुवनं –** या शब्दाचा अर्थ पृथ्वी असा आहे म्हणजे भुपुर असा संकेत होतो.

**व्याख्या :-** शरीर हे श्रीचक्र होय म्हणजे सुषुम्ना मार्ग हे श्रीचक्र आहे हे कथन केल्यानंतर आचार्य शिव आणि शक्ति यांचे ऐक्याबद्दल सांगतात शिव हेच शक्ति आहे आणि शक्ति हीच शिव होय म्हणजे परमा शक्ति ही ब्रह्म होय आणि हे सांगत असता श्रीचक्रांतर्गत शिव चक्र आणि शक्ति चक्र यांच्यातील सुसंवाद दाखवीत आहेत.
आधी वर्णन केल्याप्रमाणे शक्तिचक्राच्या पांच योनि येणेप्रमाणे ,
१ – त्रिकोण २ – अष्टार ३ –अंतर्दशार ४ – बहिर्दशार ५ – चतुर्दशार.
आणि शिवाची चार चक्रे येणेप्रमाणे
१ – अष्टदल पद्म २ - षोडश दल पद्म ३ – तीन वृत्त ४ – भुपुर
शक्ति आणि शिवाची एकता आचार्य खालील प्रमाणे दाखवीत आहेत.

| | |
|---|---|
| **त्रिकोण** | ---- **तीन वृत्त** |
| **अष्टार** | ---- **अष्टदल पद्म** |
| **अंतर आणि बहिर्दशार** | ---- **षोडशदल पद्म** |
| **चतुर्दशार** | ----- **भुपुर** |

आचार्य म्हणतात की शिव आणि शक्तिचे ऐक्य प्रामुख्याने सहा प्रकारे होते ते कसे हे पुढील श्लोकात संगितले आहे.

[१२]

**कलायां बिन्द्वैक्यं तदनु च तयोर्नादविभवे**
**तयोर्नादेनैक्यं तदनु च कलायामपि तयोः ।**
**तयोर्बिन्दावैक्यं त्रितयविभवैक्यं परशिवे**
***तदेवं षोढैक्यं भवति हि सपर्या समयिनाम् ॥ १२॥** * पाठभेद (तथैवं)

**सरळ अर्थ :-** कलेचे बिंदुमधे ऐक्य त्यानंतर या दोघांचे नादाच्या शक्तित ऐक्य मग परत दोघांचे नादामध्ये ऐक्य नंतर दोघांचे कलेमध्ये ऐक्य मग दोघांचे बिंदुमध्ये ऐक्य मग तिघांच्या शक्तीचे पराशिवात ऐक्य अश्या प्रकारे ऐक्याचे सहा प्रकार होतात आणि ही समयाचारी मार्गीयांची पूजा आहे .
**व्याख्या :-** अकराव्या श्लोकात आचार्यांनी सहा प्रकारचे ऐक्य सांगितले त्याबद्दल आचार्य सांगतात की
१ - कलेचे बिंदुमधे ऐक्य त्यानंतर या दोघांचे नादाच्या शक्तित ऐक्य
२ – नादाचे कला आणि बिंदुशी ऐक्य
३ – कलेचे नाद आणि बिंदुशी ऐक्य
४ – कला , बिंदु आणि नादाचे परशिवाशी ऐक्य
५ – नाद , कला आणि बिंदूचे परशिवशी ऐक्य
६ – कला , नाद आणि बिंदूचे परशिवशी ऐक्य

सदर श्लोकाचा अर्थ कळण्यासाठी यापुढील म्हणजे तेराव्या श्लोकाचा अर्थ आवश्यक आहे कारण त्यात आचार्य नाद कला आदी संज्ञांचे अर्थ स्पष्ट केले आहेत म्हणून या श्लोकाचे स्पष्टीकरण तेराव्या श्लोकाबरोबर केले आहे.

[१३]

**कला नादो बिन्दुः क्रमश इह व्रणाश्च चरणं।**
**षडब्जं चाधारप्रभृतिकममीषां च मिलनम् ।**
***तदेवं षोढैक्यं भवति खलु येषां समयिनां। * पाठभेद (तथैवं)**
**चतुर्धैक्यं तेषां भवति हि सपर्या समयिनाम् ॥ १३॥**

**सरळ अर्थ :-** कला नाद आणि बिंदु क्रमश: वर्ण चरण म्हणजे मूलाधार इत्यादि षटचक्र आणि ह्यांचे मिलन हे समयाचार मार्गीयांचे सहा प्रकारचे ऐक्य आहे,त्यांचे चार प्रकारचे ऐक्य सुद्धा समयाचार मार्गीयांसाठी पूजेची पद्धत आहे.
**व्याख्या :-** आचार्य म्हणतात , कला म्हणजे वर्ण , वर्ण या संज्ञेचा अर्थ दोन प्रकारे होतो ----
१ – वर्ण म्हणजे ज्यापासून श्रीविद्या होते ते नऊ आहेत
क , ए , ई , ल , ह , र . स , नाद , बिंदु
२ – वर्णमालेची अक्षरे
नादाचा अर्थ चरण , चरण या शब्दाचा आचार्यांचा अर्थ किंवा संकेत वाक् आणि त्याचे चार चरण – परा, पश्यन्ति , मध्यमा आणि वैखरी. वाक् चा अर्थ नाद आहे. चरण याचा अर्थ पाय असा घेतला तर हा नाद ब्रम्हाचे द्योतक होते , करण श्रुतिं मध्ये ब्रह्माचे चार पाद सांगीतले आहेत. चरण याचा अर्थ आपण श्रीविद्या अथवा गायत्री चे चार चरण असाहि घेउ शकतो. श्रीविद्याचे चार चरण म्हणजे चार कुट आधी सांगितले आहेत परंतु सोयीसाठी परत देत आहे --- १ – वाग्भव , २ – कामराज , - ३ शक्ति , ४ - तुर्य.
गायत्रीची चार पदे तर सर्वश्रूत आहेतच. श्रीविद्येचे तुर्य कूट हे एकाक्षरी बीज आहे, याची अंतिम अवस्था तुर्यातीत आहे जिथे उच्चार करणे शक्य नाही म्हणजे मंत्र महानादात विलीन होतो.

बिंदुचा अर्थ मुलाधारादी सहा चक्रे होतो या सगळ्यांचे सहा आणि चार प्रकारे ऐक्य होते.

**सहा प्रकारचे ऐक्य ----**

१ – शिव आणि शक्तिचे मूलाधारादी सहाही चक्रात साम्य होते या तऱ्हेने ऐक्याचे सहा प्रकार होतात. या संदर्भात ३८ व्या श्लोकात अधिक माहिती दिलेली आहे. सौन्दर्यलहरीत शंकराचार्यांनी श्लोक ३४ ते ४१ पर्यन्त या विषयाचे स्पष्टीकरण केले आहे आणि त्याचे लक्ष्मीधराच्या सौन्दर्यलहरीवरील टीकेत तसेच माझ्या गुरुदेवांनी केलेल्या भाष्यात / टीकेत चांगल्या रीतीने निरूपण केले आहे.

२ – श्लोक १२ मधे वर्णन केलेले सहा प्रकारचे ऐक्य किंवा

३ – मंत्र , यंत्र , देवता , साधक , गुरु आणि परमाशिवाचे एक दुसऱ्याशी ऐक्य किंवा

४ – श्रीविद्येचे षटचक्रांशी ऐक्य, सहा चक्रांचे शक्तिशी ऐक्य , सहा चक्रांचे श्रीयंत्राशी ऐक्य, श्रीविद्या आणि श्रीचक्राचे शक्तिशी ऐक्य , श्रीविद्या आणि श्रीचक्राचे षटचक्रांशी ऐक्य , शक्तिचे परमशिवाशी ऐक्य इत्यादि सहा प्रकारची ऐक्य किंवा

५ – मंत्र आणि मातृकांचे ऐक्य , मातृका आणि श्रीचक्राचे ऐक्य , मंत्र आणि नित्या चे ऐक्य, मंत्र आणि सहा चक्राचे ऐक्य , आणि नित्या आणि सहा चक्राचे ऐक्य. ( श्लोक २१ पहावा)

**चार प्रकारचे ऐक्य ---**

१ - आधारादि सहा चक्रांचे श्रीचक्राशी ऐक्य

२ – बिंदु स्थानाचे बैंदव स्थान अथवा सहस्त्राराशी ऐक्य. बिंदु शिवात्मक आहे जसे

**बिंदु शिवात्मको बीजं शक्तिर्नादस्तयोर्मिताः |**
**समवायाः समाख्यातः सर्वागम विशारदैः ||**

म्हणजे शक्ति आणि शिवाचे ऐक्य , कारण श्रीचक्राचे बिंदुस्थान हे भगवतीचे स्थान आहे.

३ – मल आणि आवरणरहित जीवाचे शिवाशी ऐक्य किंवा साधक आणि शिव वा शक्तिशी ऐक्य.

४ – श्रीयंत्र आणि मंत्राचे ऐक्य किंवा

१ – मातृका आणि मंत्राचे ऐक्य

२ – मंत्र आणि चक्राचे ऐक्य

३ – चक्र आणि नित्या चे ऐक्य

४ – नित्या आणि तिथिंचे ऐक्य ( श्लोक २१ पहावा)

**कलेचे बिंदुशी ऐक्य किंवा वर्णाचे चक्रांशी ऐक्य ---**

या ठिकाणी केवळ श्रीविद्येच्या वर्णांचे सहा चक्रांशी ऐक्य दाखवीत आहे कारण वर्णमालेच्या सगळ्या वर्णांचा सहा चक्राशी संबंध दाखविण्यासाठी स्वतंत्र वेगळे पुस्तक लिहावे लागेल. जिज्ञासु वाचकांना अधिक माहिती हवी असल्यास षटचक्र निरूपण आणि माझ्या गुरुदेवांनी केलेली सौंदर्यलहरीवरील टीका अभ्यासावी. या संदर्भात एक इंग्रजी ग्रंथ माझ्या पहाण्यात आहे ज्याचे नाव “ Anatomy of Alphabet and Comparative Study of Literature “ स्वामी शंकरानंद जी ह्यांनी लिहिले असून त्यांनीच ४०८, शनिवार पेठ , पुणे – २. व्हि.आर शिंगरे द्वारा , सर्वोदय मुद्रणालय – ४५० , बुधवार पेठ पुणे – २ येथून छापले आहे.

स्वामी शंकरानंद यांनी सादर पुस्तकामध्ये अक्षरांचा चक्राशी संबंध यावर मार्मिक लिखाण केले आहे. प्रत्येक अक्षराचा तत्वांशी असलेला संबंध आणि त्यांच्या किती आणि कोणत्या कला आणि किरण प्रत्येक अक्षरात आहेत ते वर्णन केले आहे. या पुस्तकातील एक सारणी पुढे घेतलेली आहे.

**श्रीविद्येच्या वर्णांचे चक्र आणि श्रीचक्राशी ऐक्य ---**
**ल कार** – शिव वाच्य आहे आणि भूमी वाच्य आहे . भूमी वाच्य आहे म्हणून ती श्रीचक्रांतर्गत भुपूर दर्शविते   आणि शिव वाच्य आहे म्हणून सहस्त्रार दर्शविला आहे याचा अर्थ  ल-कार सहस्त्राराचा द्योतक / खुण आहे.
**स कार** – शक्ति आणि चंद्राचा द्योतक आहे. चंद्र वाच्य होण्याने षोडश दल पद्म दर्शवितो आणि शक्ति वाचक असल्याने आज्ञा चक्राकडे बोट दाखवितो कारण आज्ञाचक्र हे सदाख्य तत्व वा अर्धनारीश्वराचे स्थान आहे जे शक्तिमय शिवाचे स्थान आहे.
**ह कार** – हा आकाश आणि शंकराचे द्योतक आहे. " **परमेव्योमन** " या श्रुतिच्या वचनानुसार व्योम (आकाश ) हे ब्रह्माचे स्थान आहे. शंकर (रुद्र) अष्टमूर्ती आहे यामुळे ह हे अक्षर श्रीचक्रामध्ये अष्टदल पद्म आणि शरीरात आज्ञा चक्र दर्शविते.
**ई कार** – हे अक्षर माया वाचक आहे. माया ही चौदा भुवनांची स्वामीनी आहे म्हणून हे अक्षर श्रीचक्रात चतुर्दशार आणि शरीरात विशुद्ध चक्र दर्शविते.
**ऐ कार** – हे अक्षर विष्णु योनीचे असल्याने विष्णु स्वरूपा आहे म्हणजे विष्णुच्या दहा अवतारांचा द्योतक आहे. हे अक्षर श्रीचक्रात बहिर्दशार तर शरीरात अनाहत चक्र जे विष्णूचे स्थान आहे ते दर्शविते.
**र कार** – हे अक्षर अग्निचे द्योतक आहे आणि अग्निच्या दहा जिव्हा अथवा कोण असतात म्हणजे हे अक्षर श्रीचक्रामधे अंतर्दशार आणि शरीरात मणीपुर चक्र दर्शविते.
**क कार** – हे अक्षर काम आणि शिवाचे द्योतक आहे,शिव अष्टमूर्ती असल्याने हे अक्षर श्रीचक्रात अष्टार तर शरीरात स्वाधिष्ठान चक्र दर्शविते, स्वाधिष्ठान हे कामदेवाचे स्थान आहे.
**ॅ - अर्धमात्रा** – हे अक्षर त्रिकोण अथवा योनि चे द्योतक आहे. हे अक्षर श्रीचक्रातील त्रिकोण तर शरीरातील मूलाधार चक्र दर्शविते. मूलाधार हे नादरूपा असल्याने अर्धमात्रा नादरूपा आहे.
**. बिंदु** – हे चिन्ह शशि, सोम, कला निधि, चेतना, शिव , पूर्ण, अमृताकर्षिणी, शून्य, व्योम आदींसाठी वापरले जाते. हे अक्षर श्रीचक्रात बैंदव स्थान म्हणजे त्रि वृत्त आणि शरीरात सहस्त्रार चक्र दाखविते.
भगवान दुर्वास ऋषी प्रणीत त्रिपुरामहिम्न च्या २८ व्या श्लोकावर टीका करतांना खाली दिल्याप्रमाणे वर्णन आहे.
**ल कार** –  लकार: पृथिवीं बीजं तेजो भु बिम्बमुच्यते |
**स कार** –  सकारश्चंद्रमा भद्रे कला षोडशात्मका: | तस्मात षोडश पत्रं च |
**ह कार** –   हकार; शिव उच्यते, अष्टमूर्ति सदाभद्रे | तस्मात्वसुदलं भवेत् |
**ई कार** –   इकारास्तू सदा माया भुवनानिनि चतुर्दश, पालयंती परात्साच्छक्र कोणं भवेत् प्रिये |
**ऐ कार** –   शक्तिरेकादशस्थाने स्थित्वा सुते जगत्त्रयम विष्णोर्योनिरिति ख्याता |सा विष्णोर्दशरुपकं एकारात्
परमेशानी चक्र व्याप्यव्यवस्थिता |
**र कार** –   दशकोण करं तस्मात प्रकारो ज्योतीराख्या: | कला दशान्वितो बहिर्दशकोण प्रवर्तका: |
**क कार** –  ककारान्मदनो देवि शिवं चाष्ट स्वरुपकं | योनिवश्यं तदा चक्रे वसुयोन्यन्कितं भवेत् ||
**ॅ – अर्धमात्रा** – अर्धमात्रा गुणान् सुते नाद रूपा यत् स्मृत: त्रिकोण रूपा योनिस्तु |
**. बिंदु** – बिंदुना – बैंदव भवेत् | कामेश्वर स्वरुपं तद्विश्वाधार स्वरुपकं श्रीचक्रन्तुर्विय संभवमिति |

वर दिलेले ऐक्य वा समानता खाली दिल्याप्रमाणे पण दाखविता येतात.

| कला | वर्ण | चक्राशी ऐक्य | बिंदु अथवा चक्र |
|---|---|---|---|
| ल | पृथ्वी तत्वाचे अक्षर | मूलाधार | पृथ्वी तत्व |
| क | जल तत्वाचे अक्षर | स्वाधिष्ठान | जल तत्व |
| र | अग्नि तत्वाचे अक्षर | मणिपुर | अग्नि तत्व |
| ई | चौथा स्वर | अनाहत अथवा हृदय | चौथे चक्र |
| ऐ | वाणी चे द्योतक | विशुद्ध | वाणीचे स्थान (वैखरी वाक्) |
| अर्धमात्रा | अर्धेन्दु किंवा चन्द्र | आज्ञा | चन्द्राचे स्थान |
| स | शक्ति किंवा सोमाचे द्योतक | सहस्त्रार | शक्ति व चन्द्राचे स्थान अथवा |
| स | अमृत | सहस्त्रार | अमृताचे स्थान |
| ह् | गगनमण्डलाचे द्योतक | सहस्त्रार | गगनमण्डल अथवा शिवाचे सूचक आणि परमशिवाचे स्थान |
| | **अथवा** | | |
| ल | पृथ्वी | सगळ्यांची जन्मदात्री , योनि | त्रिकोण = मूलाधार |
| क | प्रथम अक्षर, प्रथम अवस्था | त्रिकोणाचा पहिला प्रसार | अष्टार = स्वाधिष्ठान |
| र | अग्नि | अग्निच्या १० जिभा असतात | अंतर्दशार = मणिपुर |
| ई | विष्णुची माया | दश रूपा ,१० अवताराचे कारण | बहिर्दशार = अनाहत |
| ऐ | विश्व योनि, भुवन योनि | १४ भुवने असतात | चतुर्दशार = विशुद्ध , वाणी रूपाने विशुद्धाचे दर्शन |
| अर्धमात्रा | अर्ध चंद्र | अष्ट दल पद्म | आज्ञा |
| स | सोम – चंद्र मंडल | षोडश दल पद्म | |
| बिंदु | बैंदव स्थान | वृत्त = त्रिवृत्त | सहस्त्रारस्थ चंद्रमंडळ |
| ह् | शिव , शिवाचे स्थान | चतुष्कोण = भुपूर | सहस्त्रार |

**कलेचे (वर्णाचे) नादाबरोबर (चरण) ऐक्य** – ह कार म्हणजे शिव आणि स कार शक्ति दर्शवितो. शिव आणि शक्ति ह्यांचे एकरूप होणे अथवा संयोग होणे हे नादाच्या उत्पत्ति चे कारण होय. बिंदु ही नादाच्या उत्पत्ति ची आधीची अवस्था होय आणि अर्धचंद्र हा बिंदूचा पहिला प्रसार अथवा काम कला होय. या अवस्थेत नाद प्रकट होऊ पाहतो. ल कार हा पृथ्वी वाचक आहे आणि पृथ्वी पासून सर्व भूतांची (पंच महाभूत) उत्पत्ति होते म्हणून पृथ्वी ही कारणस्वरूपा होय आणि नादाची परा अवस्था आहे. क हा वर्णात प्रथम असल्याने प्रथम विस्फोटाचे द्योतक आहे आणि र हा अग्निचा द्योतक आहे अग्नी शक्तिचे कारण आहे आणि हीच स्फोटाची शक्ति आहे म्हणून क आणि र पश्यंती वाणी दर्शवितात. ई मुळे इच्छा दर्शविली जाते जिचा वाणीशी संयोग होऊन मध्यमा वाणी चा उदय होतो तसेच ए हा वाणी सूचक आहे आणि तो वैखरी वाणी दर्शवितो.

**बिंदु (चक्र) चे नादाशी ऐक्य** – आचार्य लक्ष्मीधर ह्यांनी सौंदर्यलहरी च्या ४१ व्या श्लोकाच्या टीकेमध्ये यावर प्रकाश टाकला आहे.

| बिंदु (चक्र) | नाद | श्रीचक्राचा भाग |
|---|---|---|
| मूलाधार | परा | त्रिकोण |
| स्वाधिष्ठान | पश्यन्ति | अष्टार |
| मणीपुर – हृदय | मध्यमा | दशार द्वय |
| विशुद्ध | वैखरी | चतुर्दशार |
| आज्ञा | नाद आणि नादान्त = शिव | चतुष्कोण |
| सहस्त्रार | नादबिंदुकलातितं = भगवती | त्रिपुरसुंदरी , परा संवित |

या ठिकाणी ऐक्य म्हणजेच समानता अथवा एकत्व कोष्टकरूपात दाखविले आहे या संबंधी अधिक माहितीसाठी
वाचकांनी आचार्य लक्ष्मीधर यांची सौंदर्यलहरीवरील टीका अभ्यासावी.

**[१४]**

**तडिल्लेखामध्ये स्फुरति मणिपूरे भगवती**
**चतुर्धैक्यं तेषां भवति च चतुर्बाहुरुदिता ।**
**धनुर्बाणानिक्षूद्भवकुसुमजानङ्कुशवरं**
**तथा पाशं बिभ्रत्युदितरविबिम्बाकृतिरुचिः ॥ १४॥**

**सरळ अर्थ** – मणीपुर चक्रात देवी भगवती विद्युतरेखेच्या मध्ये अवतरीत होते. तिचे ४ प्रकाराचे रूप अथवा साधर्म्य असते , या ठिकाणी भगवतीचे चतुर्भुज स्वरूप उदयास आलेले आहे. तिच्या चार हातात इक्षु म्हणजे उसाचे धनुष्य , पाच पुष्प बाण आहेत, अत्तुत्तम असा पाश तसेच अंकुश आहे ,उगवत्या सूर्याप्रमाणे म्हणजे अरुण रंगाची तिची कांती आहे.

**व्याख्या** – साधकाला जेव्हा चार प्रकारचे ऐक्य समजते म्हणजेच गुरुकृपेमुळे शक्ति च्या चार अविर्भावांचे ज्ञान होते तेव्हा विजेसमान प्रकाशपुंजाची चकाकी असलेली भगवती दिसते त्यावेळी भगवती ही चतुर्भुज स्वरुपात असते व ती आपल्या चार हातात धनुष्य बाण पाश व अंकुश घेतलेली दिसते. गुरुकृपेशिवाय हे घडणे शक्य नसते. गुरुदेव जेव्हा महावेध दीक्षा देतात तेव्हा भगवती मणीपुर चक्रात प्रत्यक्ष प्रगट होते. या संदर्भात आचार्य श्री लक्ष्मीधर लिहितात की

**गुरु कटाक्षसंजात महावेध महिम्ना च भगवती भवति मूलाधार स्वाधीष्ठानात्मक चक्रद्वयम भित्वा मानिपुरे प्रत्यक्षम प्रतिभाति |**

या ठिकाणी भगवती मणीपुरात प्रगट होते याचा मतितार्थ असा आहे की समयाचार मार्ग अवलंबन करणाऱ्या साधकांसाठी सगळ्यात खालच्या दोन चक्रांमध्ये (मूलाधार व स्वधिष्ठान) पूजा करणे अयोग्य आहे निषिद्ध आहे कारण ही दोन चक्रे अंधारमय आहेत. मूलाधार अंधतामिस्त्र आहे म्हणजे ज्ञानाच्या

प्रगटिकरणास सक्षम नसलेला असा आहे आणि स्वधिष्ठान चक्र हे सूर्यरश्मि च्या संपर्कात असल्याने मिश्र असे आहे. मणीपुरात अग्निचे वास्तव्य आहे इथे मेघांच्या स्वरुपात असलेले पाणी (जल) सूर्यकिरणांनी प्रतिबिंबीत आहे म्हणून मणीपुर चक्र मिश्र स्वरूप आहे परंतु मणीपुराच्या खालील दोन चक्रांपेक्षा मणीपुरात अधिक प्रकाश आहे. अनाहत चक्र ज्योतीर्लोक आहे कारण या ठिकाणी सूर्याचे स्थान आहे अश्याप्रकारे अनाहत चक्रापर्यंत अंधतामिस्त्र, मिश्र , ज्योतीर्लोक आहेत तसेच विशुद्ध चक्र चंद्रलोक आहे, आज्ञाचक्र चंद्राचे स्थान असल्याने अमृत लोक आहे. विशुद्ध चक्राच्या खालील लोकांमध्ये चंद्राची लखलखीत चमक (ज्योत्स्ना) नसते. सहस्त्रदल कमळ हे ज्योत्स्नेचे निवासस्थान आहे अथवा ज्योत्स्ना लोक आहे. सहस्त्रदलात असलेला चंद्र नित्य कलेने युक्त असा आहे.
दहाव्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे सुषुम्ना नाडीत असलेले सहा चक्र आणि सहस्त्रार चक्र म्हणजे श्रीचक्र होय.
आज्ञाचक्रातील चंद्राच्या पंधरा कला आहेत आणि सोळावी कला प्रतिफलीत (परिणाम स्वरूप) आहे. सोळावी कला सहस्त्रारातिल चंद्रात आहे आणि तिचा प्रकाश आज्ञाचक्रातील चंद्रावर पडतो तसेच आज्ञाचक्रातील चंद्राचा प्रकाशाने विशुद्ध चक्र प्रकाशमान होते.
या ठिकाणी असे म्हणता येईल की मूलाधार आणि स्वधिष्ठान चक्रातील शक्ति प्रवृत्ती कडे जाण्याऱ्या आहेत म्हणून इथे या चक्रांची उपासना अथवा कुंडलिनीचे ध्यान वर्ज्य आहे. कुंडलिनी शक्तिचे चार स्तर आहेत अध:, मध्य, ऊर्ध्व आणि परा. अध: शक्ति जीवाला संसारात मग्न ठेवते. मूलाधार आणि स्वधिष्ठान चक्र प्रजनन आणि देहाधिष्ठित कार्याशी संबधित आहे. साधारणपणे मनुष्य यातच बद्ध किंवा निमग्न असतो. या स्तरापेक्षा वरील स्तर हा मध्य शक्ति चा स्तर जो बौद्धिक स्तर आहे जिथे मनुष्याची विवेकशक्ति कार्यांचे नियंत्रण करते. बुद्धिजीवी मनुश्यांचा हा स्तर आहे. तिसरा स्तर म्हणजे ऊर्ध्व स्तर हा आध्यात्मिक शक्ति स्तर आहे आणि इथे मनुष्य आध्यात्मिकतेकडे अग्रसर होतो. शेवटचा स्तर म्हणजे परा स्तर हा शिव भाव आहे आणि इथेच परा शक्ति आहे., मूलाधार आणि स्वधिष्ठान चक्र मनुष्याला प्रवृत्ती कडे घेऊन जात असल्याने आणि आचार्यांचे ध्येय मोक्षाकडे घेऊन जाणे असल्याने मूलाधार आणि स्वधिष्ठान चक्रांचे पूजन त्यांनी त्याज्य ठरविले आहेत.
भगवतीच्या चार भुजा जणू चार प्रकारचे ऐक्य (चार अविर्भावांचे ज्ञान ) दाखवितात. भगवती महामायेच्या रूपाने जीवाच्या बंधनाचे कारण कारण आहे. तिने आपल्या आयुधा द्वारे आत्म तत्वाला बद्ध केलेले आहे.
ललिता सहस्त्रनामात सांगितले आहे की

**उद्यद्भानु-सहस्राभा चतुर्बाहु-समन्विता । रागस्वरूप-पाशाढ्या क्रोधाकाराङ्कुशोज्ज्वला ॥ २॥**
**मनोरूपेक्षु-कोदण्डा पञ्चतन्मात्र-सायका । निजारुण-प्रभापूर-मज्जद्ब्रह्माण्ड-मण्डला ॥ ३॥**

म्हणजे रागरूपी पाश , क्रोधरूपी अंकुश , मनरूपी धनुष्य , आणि पंच तन्मात्रा रूपी बाणाने भगवती महामाया ही मनुष्याची शिकार करते म्हणजे जीवाला बंधनात गुंतवते.
भगवान श्री शंकराचार्यांनी या श्लोकाच्या संदर्भात सौंदर्यलहरी च्या ७ व्या श्लोकात भगवतीचे ध्यानाचे विवरण केले आहे,त्यावर टीका करतांना माझे पूज्य गुरुदेव श्री श्री १००८ विष्णुजी तीर्थ यांनी मार्मिक विवेचन केलेले आहे, जिज्ञासु वाचकांनी हिंदी टीकेचे पृष्ट क्र. ९३ ते ९७ पहावे.
तंत्रराजाच्या वासना पटलात सांगितले आहे की

**मनोभवेदिक्षुधनु: पाशोराग उदीरीत: | द्वेष स्यादङ्कुश: पंच तन्मात्रा पुष्प सायका: ||**

भावनोपनिषदात सांगितले आहे की
**शब्द स्पर्श रूप रस गंधा: पंच तन्मात्रा पंच पुष्पबाणाः मन इक्षु धनुः वश्यो बाणो रागः पाशः द्वेषोऽङ्कुशः।।**

उत्तर चतु:शती मध्ये या विषयी लिहिले आहे की

**इच्छा शक्तिमयं पाशं मंगलं ज्ञान रूपिणं | क्रियां शक्ति मये बाण धनुषी दधदुज्ज्वलम ||**

त्रिपुरामहिम्न वरील टीकेमध्ये पृष्ट ८७ वर याचा सुंदर ऊहापोह केलेला आहे. महामुनी श्री दुर्वास कृत त्रिपुरा महिम्न वरील श्री राजगुरू कुलमार्तंड पंडित योगेन्द्रकृष्ण दोर्गादत्ती शास्त्री कृत श्री पितांबरा पीठ संस्कृत परिषद द्वारा प्रकाशित हिंदी टीका पहावी.
भगवतीच्या आयुधांबद्दल महामुनी श्री दुर्वास त्रिपुरामहिम्न स्तव स्तोत्रात म्हणतात की

**अथ तव धनुः पुण्ड्रेक्षुत्वात् प्रसिदध्मतिद्युति त्रिभुवनवधू मुद्यज्ज्योत्स्नाकलानिधि-मण्डलम् ।
सकल जननि स्मारं स्मारं गतः स्मरतां नरः त्रिभुवनवधू-मोहाम्बोधेः प्रपूर्णविधु-र्भवेत् ॥ ४६॥**

**प्रसून शर पञ्चक प्रकट जृम्भणागुम्भितं त्रिलोकमवलोकय त्यमलचेतसाऽचञ्चलम् ।
अशेष तरुणीजन स्मरविजृम्भणे यः सदा पटुर्भवति ते शिवे त्रिजगदङ्गनाक्षोभणे ॥ ४७॥**

**पाशं प्रपूरित-महा-सुमति-प्रकाशो यो वा तव त्रिपुरसुन्दरि सुन्दरीणाम् ।
आकर्षणेऽखिलवशीकरणे प्रवीणं चित्ते दधाति स जगत्त्रय-वश्यकृत् स्यात् ॥ ४८॥**

**यः स्वान्ते कलयति कोविद-स्त्रिलोकी- स्तम्भारम्भणचण-मत्युदारवीर्यम् ।
मातस्ते विजय-निजाङ्कुशं स योषाः देवान्स्तम्भयति च भूभुजोऽन्यसैन्यम् ॥ ४९॥**

**चाप च्यान वशाद्भवोद्भव महामोहं महाजृम्भणं प्रख्यातं प्रसवेषुचिन्तन-वशात् तत्तच्छरव्यं सुधीः ।
पाशध्यानवसात् समस्तजगतां मृत्योर्वशत्वं महा- दुर्गस्तम्भ-महाङ्कुशस्य मननान्माया-ममेयां तरेत् ॥ ५०॥**

**[१५]**

**भवत्यैक्यं षोढा भवति भगवत्याः समयिनां
मरुत्वत्कोदण्डद्युतिनियुतभासा समरुचिः ।
भवत्पाणिव्रातो दशविध इतीदं मणिपुरे
भवानि प्रत्यक्षं तव वपुरुपास्ते न हि परम् ॥ १५॥** इत्यैक्यनिरूपणम्

**सरळ अर्थ :-** साधर्म्य झाल्यानंतर भगवती समयाचारी साधकांसाठी सहा प्रकारची होते आणि मणीपुर चक्रात इंद्रधनुष्याच्या द्युतीने युक्त अशा प्रभेप्रमाणे आणि दहा प्रकारच्या हातांच्या प्रमाणे होते. हे भवानी तुझ्या अशा प्रकारच्या शरीराची उपासना दुसरी कुठलीही नाही.

**व्याख्या :-** समयाचार मार्गाचे अवलंबन करणाऱ्या साधकाला जेव्हा सहा प्रकारचे ऐक्य म्हणजे काय याचे ज्ञान होते तेव्हा चक्र म्हणजेच भगवती हे कळू लागते आणि त्यानंतरच इंद्रधनुष्याची आभा असलेली दशभुजा भगवती मणीपुर चक्रात प्रगट होते. मणीपुर चक्राच्या दहा पाकळ्या भगवतीच्या दहा भुजा आहेत आणि चक्र हे भगवतीचे शरीर होय. मणीपुर चक्रात जल (पाणी) हे मेघस्वरूपात असते कारण स्वधिष्ठान चक्रातील जल मणीपुर चक्रातील अग्निमुळे वाफेत रूपांतरित होऊन मेघरूप होते.

ह्यामुळेही मणीपुर चक्राला जल तत्वाचे स्थान मानले गेले आहे. या मेघांवर अनाहत चक्रातील सूर्याची किरणे पडल्याने ते इंद्रधनुष्याप्रमाणे चमकू लागतात.
दहा हातांबद्दल असेही म्हणता येईल की सहा प्रकारचे आणि चार प्रकारचे ऐक्य मिळून भगवतीचे दहा हात आहेत.

**येथे ऐक्य निरूपण पूर्ण झाले.**

**[१६]**

**भवानि श्रीहस्तैर्वहसि फणिपाशं सृणिमथो**
**धनुः पौण्ड्रँ पौष्पं शरमथ जपस्रक्षुकवरौ ।**
**अथ द्वाभ्यां मुद्रामभयवरदानैकरसिकां *|** *पाठभेद **पाठभेदरसिके**
**क्वणद्वीणां द्वाभ्यां * त्वमुरसि कराभ्यां च बिभृषे ॥ १६॥** *पाठभेद **उरसि च**

**सरळ अर्थ :-** हे भवानी , तु आपल्या हातात नागपाश, अंकुश, पौण्ड्राचे धनुष्य , फुलांचे बाण , जपमाला , आणि श्रेष्ठ शुक (पोपट) आहेत आणि तुझे दोन हात अभय आणि वर मुद्रेत आहेत , दोन हातांनी तू छातीशी क्वण क्वण असा नाद करणारी वीणा धारण केलेली आहेस.
**व्याख्या :-** पंधराव्या श्लोकात भगवतीला दशभुजा म्हटलेले आहे. आता आचार्य या श्लोकात दहा हातातील आयुधाविषयी सांगत आहेत. भगवतीने आपल्या सहा हातात पाश,अंकुश,धनुष्य,बाण,जपमाळा तसेच शुक धारण केले असून शेष चार हातांपैकी दोन हाताने वीणा वादन करीत आहे तर दोन हाताने वर आणि अभय मुद्रा केलेली आहे.
**पाश,अंकुश,धनुष्य,बाण** :- या विषयी मागील श्लोकात विवरण झालेले आहे. भगवतीच्या हातातील जपमाळ ही जपाचे महत्त्व विशद करीत आहे. योगसूत्रात म्हटले आहे की **जपात सिद्धिः ||** तसेच भगवान स्वत: गीतेच्या १० व्या अध्यायातिल २५ व्या श्लोकात सांगतात की -- **यज्ञानां जप यज्ञोस्मि ||**
**शुक** :- (पोपट= रावा) हे जीवभावाचे सूचक आहे.
**अभय मुद्रा:-** भगवती आपल्या भक्तांना अभय दान देते, जो साधक एक वार परम करुणामयी मातेला शरण जातो तो सर्व प्रकारच्या भया पासून मुक्त होतो. भगवान आपल्या भक्तांचे सदैव रक्षण करतात.

**आवत देखि सक्ति अति घोरा। प्रनतारति भंजन पन मोरा।।**
**तुरत बिभीषन पाछें मेला। सन्मुख राम सहेउ सोइ सेला।।** तुलसीकृत रामायण - लंका काण्ड.

**वर मुद्रा: –** याद्वारे भगवती आपल्या भक्तांना सर्व प्रकारचे वरदान देते.
**वीणा :-** वीणा हे वाक (वाणी) चे द्योतक आहे , वीणा असे दर्शवते की भगवती कुंडलिनी शक्ति जागृत झाल्यानंतर नादाचा उद्भव होतो आणि साधकाला नाद ऐकू येऊ लागतो. वीणा संगीताचीही सुचक आहे, कुंडलिनी जागृत झाल्यावर गायनादी क्रिया होतात , साधक अनेक प्रकारचे राग रागिणी आपोआप गाऊ लागतो. भगवतीच्या उपासनेने साधक संगीतातही प्रवीण होतो.
या ठिकाणी असेही म्हणता येईल की महामाया रूपामद्धे एकीकडे पाश,अंकुश,धनुष्य,बाण यांनी शुकरूपि जीवाला संसारात बद्ध केले आहे ,मोहित केले आहे तर दुसरीकडे भगवती जीवाला अभय देते की संसारात घाबरू नकोस, हे शिक्षण भगवती देते कारण या मार्गावर चालण्यानेच जीव मोक्ष प्राप्त करू शकेल. या कार्यासाठीच आपण मा भगवतीच्या चरणी आलेलो आहे आणि म्हणून भगवती साधकाला भयरहित करून वरदान देते. साधक जपसाधनेमध्ये रममाण झाल्यानंतर नाद श्रवणाचा

अधिकारी होतो. जपमाळा आणि वीणा हे मनाला वश किंवा एकाग्र करण्याची दोन प्रमुख साधने आहेत १) जप (नामस्मरण) २) संगीत साधन ( भगवत स्तुति, भजन , कीर्तन आदी)
असेही म्हणता येईल की पाश इंद्रिय संयम दर्शवितो तर अंकुश मनरूपी हत्तीला नियंत्रित करणे होय, धनुष्य हा प्रणव (ॐकार) तर बाण म्हणजे आत्मा आणि जपमाळ प्रणवाचा जप तर वीणा नाद दर्शविते. म्हणजे जो साधक मनाला वश करून संयमपूर्वक प्रणवाच्या जपरूपी धनुष्यावर आत्मरूपी बाण चढवितो तो नाद मार्गाचे अनुसरण करून मुक्त होतो.

श्रुति मध्ये संगितले आहे की

**धनुर् गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासा निशितं सन्धयीत ।**
**आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं तदेवाक्षरं सोम्य विद्धि ॥ ३॥**

**प्रणवो धनुः शारो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।**
**अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत् तन्मयो भवेत् ॥ ४॥** -- मुंडकोपनिषद - द्वितीय मुंडक - द्वितीय खंड.

[१७]

**त्रिकोणैरष्टारं त्रिभिरपि दशारं समुदभू-**
**द्दशारं भूगेहादपि च भुवनाश्रं समभवत् ।**
**ततोऽभून्नागारं नृपतिदलमस्मात्त्रिवलयं**
***चतुर्द्वाःप्राकारत्रितयमिदमेवाम्ब *शरणम् ॥ १७॥** पाठभेद **चतुर्धा; चरणम्**

**सरळ अर्थ :-** त्रिकोण **,** त्रिकोणांचा बनलेला अष्टार , त्रिकोणाने बनलेला दशार मग खालील दशारानंतर चा दशार तथा चतुर्दशार होतो मग अष्टदल पद्म , षोडशदल पद्म आणि तीन वृत्त अथवा वर्तुळे त्यानंतर तीन रेषांचा प्राकार आहे. हे माते असे हे तुझे निवासस्थान आहे.

**कठीण शब्दार्थ –** भून्नागारं = भू: नागार = नाग = दिग्गज = आठ या संख्या वाचक
नृपतिदल = नृपती शब्दाचा प्रयोग १६ या संख्येचा म्हणजे षोडश दल°
**व्याख्या:-** या आधीच्या श्लोकांमधून भगवती महात्रिपुरसुंदरी च्या स्वरूपाचे वर्णन तसेच विभिन्न प्रकारचे ऐक्य दाखवले आहे आता आचार्य श्रीचक्राचे वर्णन करीत आहेत. श्री यंत्र कसे तयार करावे याचा विधी माझ्या गुरुदेवांनी त्यांच्या सौन्दर्यलहरी वरील टीकेत दिले आहे संस्कृत भाषेतील बऱ्याच रचनांमध्ये श्रीचक्राचा तयार करण्याचा विधी दिलेला आहे, ग्रंथ विस्तार भयामुळे संपूर्ण विधी येथे देता येत नाही. प्रस्तार आणि पृष्ठभेदाने
श्रीयंत्र तीन प्रकारचे आहे.
**प्रस्तार भेद** :- १) मेरू प्रस्तार २) कैलास प्रस्तार ३) भू प्रस्तार
सौंदर्य लहरी च्या ३१ व्या श्लोकावरील टीकेत श्री लक्ष्मीधर यांनी विस्तारपूर्वक वर्णन केले आहे जिज्ञासू वाचकांनी जरूर पहावे.
**पृष्ठ भेद** :- १) भु पृष्ठ - हे यंत्र समतल म्हणजे सपाट असते.
२)कूर्म पृष्ठ – हे यंत्र कासवा प्रमाणे असते.
3)मेरू पृष्ठ – हे यंत्र पर्वताकार उठावदार असते जसे पिरॅमीड अथवा शंक्वाकृती.

[१८]

**चतुःषष्टिस्तन्त्राण्यपि कुलमतं निन्दितमभू-** पाठभेद कुलनुतंनिन्दितमिदं तदेतन्मिश्राख्यं
**द्यदेतन्मिश्राख्यं मतमपि भवेन्निन्दितमिह ।**
**शुभाख्याः पञ्चैताः श्रुतिसरणिसिद्धाः प्रकृतयो**
**महाविद्यास्तासां भवति *परमार्थो भगवती ॥ १८॥** पाठभेद परमार्था

**सरळ अर्थ :-** हे माते भगवती ! ६४ तंत्रांमद्धे ही कुल मताची (कौल मत) निंदा केली आहे आणि त्यातून निघलेला मिश्र मार्ग हा सुद्धा त्याज्य ठरतो. शुभा नामक जे पांच आहेत ते श्रुतिद्वारा सिद्ध आहेत.त्यांची प्रकृतीरूपी ही महाविद्या परमार्थ देणारी आहे.
**व्याख्या:-** सदर श्लोकामध्ये आचार्य कौल मार्ग आणि मिश्र मार्गाला त्याज्य ठरवितात. शुभागम पंचक , म्हणजे समयाचार मार्गाचे प्रतिपादन करणारे पांच ग्रंथ आहेत आणि ते श्रुतिसम्मत आहेत म्हणजे समयाचार मार्ग श्रुतिसम्मत आहे. या ठिकाणी आचार्य श्रीविद्येचे श्रुति संमत असणे सांगत आहेत. हे समजावून सांगणे गरजेचे आहे कारण काही जण श्रीविद्येची उपासना ही तांत्रिक उपासना समजतात. वेदप्रतिपादित अशी श्रीविद्या उपासना मोक्ष देणारी आहे आणि श्रुति संमत असल्याने समयाचार मार्ग हा उपास्य आहे.
शुभागम पंचक – वासिष्ठ , सनक , शुक , सनंदन आणि सनत्कुमार यांनी सांगितलेले वैदिक मार्गानुसार असणारे अनुष्ठान , पूजा. इ.
चौसष्ठ तंत्रांची नावे अनेक ग्रंथांमधून दिलेली आहेत. माझे पूज्य गुरुदेव यांनी सौन्दर्यलहरी वरील टीकेत चौसष्ठ तंत्रांची नावे दिली आहेत.

[१९]

**स्मरो मारो मारः स्मर इति *परो मारमदन** - पाठभेद स्मरो
**स्मरानङ्गाश्चेति* स्मरमदनमाराः स्मर इति ।** पाठभेद श्चैते
**त्रिखण्डः खण्डान्ते *कलितभुवनेश्यक्षरयुत-** पाठभेद कलितभुवने ते क इति यः
**श्चतुःपञ्चार्णास्ते त्रय इति च पञ्चाक्षरमनुः* ॥ १९॥** पाठभेद मनोः

**सरळ अर्थ :-** स्मरो मारो, मारः आणि स्मर परत पर (स्मर) मार, मदन, स्मर आणि अनंग त्यानंतर स्मर, मदन म्हणजे मार लक्षात ठेवा. याप्रमाणे तीन भाग झाले, परत या तीन भागांच्या शेवटी (पांच वर्ण असलेला) सुंदर , भुवनेश्वरी बीज अश्या प्रकारे हे ४ ,५ आणि ३ अक्षरे असलेले पांच पांच अक्षरांचे मंत्र होतात.
**व्याख्या:-** आता आचार्य श्रीयंत्र समजावून सांगितल्यावर आता श्रीविद्या सांगत आहेत . या मंत्राचे तीन भाग आहेत पहिल्या भागात ४ अक्षरे आहेत, दुसऱ्या भागात ५ तर तिसऱ्या भागात ३ अक्षरे आहेत. प्रत्येक भागाच्या शेवटी भुवनेश्वरी बीज आहे ज्यात ५ वर्ण आहेत आणि शेवटी ५ वर्णांचा मंत्र आहे. मंत्राच्या अक्षरांना आचार्यांनी सांकेतिक भाषेत संगितले आहे. भुवनेश्वरी बीजात येणारे ५ वर्ण – ह र ई अर्धचंद्र आणि बिंदु आहे. याचप्रकारे शेवटचा मंत्र सुद्धा ५ अक्षरांचा बनलेला आहे.
षोडशी म्हणजे श्रीविद्येचा उपदेश गुरुमुखाने घ्यावा म्हणून हा मंत्र येथे प्रगट करता येत नाही.

मंत्राच्या प्रत्येक भागात ५ – ५ अक्षरे असल्याने प्रत्येक भाग पंचाक्षर मनू होतो परंतु दुसऱ्या भागात ६ अक्षरे आहेत परंतु त्याचे शेवटचे भुवनेश्वरी बीज तिसऱ्या कुटाबरोबर जोडले जाते अश्याप्रकारे प्रत्येक कूट ५ – ५ अक्षरांचे होऊन जाते.

**[२०]**

**त्रिखण्डे त्वन्मन्त्रे शशिसवितृवह्न्यात्मकतया**
**स्वराश्चन्द्रे लीनाः सवितरि कलाः कादय इह ।**
**यकाराद्या वह्नावथ कषयुगं बैंदवगृहे**
**निलीनं सादाख्ये शिवयुवति नित्यैन्दवकले ॥ २०॥**

**सरळ अर्थ :-** हे माते तुझा मंत्र चंद्र , सूर्य , अनलात्म असा तीन भागांनी बनला आहे. त्यातील उपयोगात आणले जाणारे स्वर चंद्रात्मक आहेत तर क आदी वर्ण सूर्यात्मक आहेत. य वर्ग अग्नी आत्मक आहे म्हणजे य वर्गाचे वर्ण अग्नी आत्मक आहेत. क आणि ष मिळून " क्ष " हे बैंदव – गृह आहे. हे शिव युवती सदाख्य तत्वात मिसळून जाऊन अथवा विलीन होऊन तिथे चंद्राच्या नित्य कला स्वरुपात तू विराजमान होतेस.

**व्याख्या:-** आचार्य या ठिकाणी श्रीविद्येच्या तीन भागांबद्दल सांगत आहेत. ८ व्या श्लोकात श्रीचक्राचे चंद्र सूर्य आणि अनल असे तीन भाग संगितले होते. आता आचार्य यंत्र आणि मंत्र यांचे ऐक्य दाखवितांना इथे मंत्राचेही तीन भाग सांगत आहेत जे चंद्र सूर्य आणि अनलात्म आहेत. मंत्रात योजलेल्या अक्षरांमध्ये स्वर हे चंद्र रूप, क आदी वर्ण सूर्यरूप तर य वर्गाची अक्षरे अग्नी आत्मक आहेत आणि मंत्राचा शेवटचा भाग (कूट) हे बैंदव स्थान आहे. क्ष कार अक्षरांच्या शेवटच्या वर्गाचे आदी अक्षर असल्याने शेवटच्या कूटाकडे संकेत करतो. क्ष कार याचा अर्थ आकाश असा घेता येतो आणि आकाशाचा गुण शब्द असल्याने नादाचेही सूचक होते म्हणजे मंत्रामध्ये असलेला नाद (बिंदु व अर्धेन्दू) बैंदव स्थान आहे.

**मंत्र आणि यंत्र आणि सुषुम्नातर्गत चक्रांचे ऐक्य**

| भाग | श्रीयंत्राचे भाग | सुषुम्नातर्गत चक्र | मंत्राचे कूट | मंत्राचे अक्षर |
|---|---|---|---|---|
| सोम ( चंद्र ) | चतुर्दशार , अष्टदल , आणि षोडशदल पद्म | विशुद्ध आणि आज्ञा | शक्ति | स्वर |
| सूर्य | दशार द्वय | मणीपुर आणि अनाहत | कामराज | क आदि वर्ण |
| अग्नी | त्रिकोण आणि अष्टार | मूलाधार व स्वधिष्ठान | वाग्भव | य वर्गाचे वर्ण |
| बैंदव स्थान | तीन वृत्त (वर्तुळ) आणि भुपूर | सहस्त्रार चक्र | अंतिम तुर्य | नाद |

श्रीयंत्रात जशी चंद्र , सूर्य , अग्नी आणि बैंदव स्थाने आहेत तसेच मंत्रांमध्ये ही आहेत. श्रीयंत्र आणि शरीर यांचे ऐक्य या आधी दाखविले आहे. बैंदव स्थान म्हणजे सहस्त्रार चक्र आहे आणि महानादाचे स्थानही तेच आहे. असे सांगितले जाते की मंत्राचे शेवटचे कुटाचे स्थान सहस्त्रार आहे.

मंत्राचे तीन भाग असेही दाखविता येतात - १) स्वर २) वर्ण ३) नाद आणि मंत्राचे अंतिम वा तुर्य कूट नादान्त अथवा कारण बिंदु होईल. येथे मंत्र आणि कला (अक्षर समूह) यांचे ऐक्य दाखविले आहे.
मंत्राचा चंद्र भाग (खण्ड) – चंद्रात्मक असल्याने सगळे स्वर सूचित केले जातात.

मंत्राचा सूर्य भाग (खण्ड) – सूर्यात्मक असल्याने क ते म पर्यन्त चे वर्ण सूचित केले जातात.
मंत्राचा अग्नी भाग (खण्ड) – अनलात्मक असल्याने य र ल व श ष स इत्यादि वर्ण सूचित केले जातात.
मंत्राचा बैंदव भाग - क्ष ने सूचित केले जाते
ह विसर्ग आणि
अश्या प्रकारे सर्व मातृका पंचदशी मंत्राचे रूप आहे.

**[२१]**

**ककाराभ्यां स्वरगणमवष्टभ्य निखिलं**
**कलाप्रत्याहारात्सकलमभवद्व्यञ्जनगणः ।**
**त्रिखण्डे स्यात्प्रत्याहरणमिदमन्वक्कषयुगं*** पाठभेद - मञ्चत्कषयुगं
**क्षकारश्चाकारोऽक्षरतनुतया चाक्षरमिति ॥ २१॥**

**सरळ अर्थ :-** क काराचा जो अ कार आहे त्याचा सगळ्या स्वरांवर अधिकार आहे. कलेचा लोप होण्याने व्यंजनांचाही लोप होतो. तीनही भागांचा लोप क आणि ष यांच्या मध्ये म्हणजे क्ष मध्ये होतो. क्ष कार आणि अ कार हे अक्षरांचे शरीर (धड) आहे आणि म्हणून हे " अक्षर " आहे.
कठीण शब्द – अवष्टंभ = अधिकार करून.
**व्याख्या :-** क कारात जो अ कार आहे तो सगळ्या स्वरांवर अधिकारी आहे अर्थात क कारा बरोबर अ कार सगळ्या स्वरांचे प्रतिनिधित्व करतो म्हणजे अ कार हा सगळ्या स्वरांचे द्योतक आहे. व्याकरणात स्वर समूहाला "अच" असे संबोधले जाते. साधारण भाषा वापरतांना ही आपण स्वरांना "अ आदी" म्हणतो , म्हणजे "अ आदी" चा अर्थ स्वर समूह असा होतो.
या ठिकाणी कलेचा अर्थ स्वर असा आहे कारण कलांची संख्या सोळा सांगितली जाते. स्वर सुद्धा सोळा आहेत. व्यंजन समुहामधून स्वर बाजूला केले असता व्यंजन अपूर्ण ठरतात म्हणजे स्वराशिवाय व्यंजनांचा प्रयोग करता येत नाही म्हणजे स्वराशिवाय व्यंजनांचा उच्चार ही शक्य नाही. भगवान शंकराचार्य सौन्दर्यलहरी मध्ये सांगतात की

**शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुं।**

शारदातिलक तंत्रात सांगितले आहे की

**विना स्वरैस्तु नान्येषां जायते व्यक्तिरञ्जसा |**
**शिवशक्तिमयान प्राहुस्तस्मादवर्णान मनीषिणः ||**

मातृकाहृदयात सांगितले आहे की

**ककारादी क्षकारान्ता वर्णास्ते शिवरुपिण:|**
**समस्तव्यस्तरूपेण षटत्रिंशतत्व विग्रहः ||**
**अकारादिविसर्गान्ता: स्वरा: षोडश शक्तय:|**
**नित्याषोडशकात्मान: परस्परममी युता:||**
**शिवशक्तिमया वर्णा: शब्दार्थ प्रतिपादका:|**
**शिव: स्वरपराधीनो न स्वतंत्र: कदाप्यसौ ||**
**स्वरा: स्वतंत्रा: जायन्ते न शिवस्तु कदाचन |**

मंत्राच्या तीन भागांचा क ष च्या जोडीत अथवा क्ष कारात लोप होतो. क्ष काराचा अर्थ आधी सांगितल्याप्रमाणे आकाश असा होतो आणि आकाश हे नादाचे द्योतक आहे यामुळे असे म्हणता येते की मंत्राच्या तीन भागांचा नादामध्ये लय होतो आणि क्ष कार हे बैंदव गृह होय.
वर सांगितलेले आहे की स्वराशिवाय व्यंजन राहू शकत नाही , स्वराशिवाय वर्णांचा उच्चार ही शक्य नाही. स्वर नादामुळे उत्पन्न होतात म्हणून नाद प्रमुख आहे.
याआधी सांगितल्याप्रमाणे मंत्रांचे तीन भाग आहेत – वर्ण , स्वर आणि नाद. वर्ण स्वरांवर अवलंबून आहेत तर स्वर नादावर आणि हे तीनही नादान्त म्हणजे नादाच्या कारण अवस्थेवर अवलंबून आहेत.
क्ष कार अक्षरांचे शरीर आहे आणि अव्यक्त नादच शब्दांचा उगम आहे म्हणून याला “अक्षर “ म्हणतात. या ठिकाणी असे म्हणता येईल की अ अक्षराने सगळ्या स्वरांचा बोध होतो. क्ष कारात क आणि ष असल्याने वर्ण समूहाचा ( क च ट त प य ह ष म्हणजे क वर्ग ते ष वर्गापर्यंत ) द्योतक आहे. अश्या तऱ्हेने अक्षर शब्दाने संपूर्ण वर्णमालेचा बोध होतो,
मंत्रार्थ :- अ कार वर्ण आणि स्वर दर्शवितो कारण वर्ण स्वरांशिवाय असू शकत नाही आणि क्ष कार म्हणजेच आकाश पासून ह अथवा विसर्ग (:) घेतला जाऊ शकतो. जसे

**बिंदु-प्राण-विसर्ग-जीवसहितं बिंदु-त्रिबिजात्मकं**
**षट्कूटानि विपर्ययेण निगदेत् तारत्रिबालाक्षरैः ।**
**एभिः सम्पुटितं प्रजप्य विहरेत्प्रासाद-मन्त्रं परं**
**गुह्यद्गुह्यतमं सयोगजनितं सद्भोगमोक्षप्रदम् ॥ ३२॥** ----त्रिपुरामहिम्न

अश्याप्रकारे अ आणि ह चा उद्धार होतो (अर्थाचा बोध होतो) आणि यामुळे परा विद्येचा बोध होतो हे वरील त्रिपुरामहिम्न स्तोत्रा वरुन कळते.

किंवा

मंत्राचे पहिले अक्षर क हे क आणि अ च्या योगाने बनले आहे. क हे सगळ्या वर्णाचे तर अ हे सगळ्या स्वरांचे प्रतिनिधित्व करतात. अ सगळ्या स्वरांवर अधिग्रहीत आहे. व्याकरणात सगळ्या स्वर समूहाला “अच” म्हणतात.
कला १६ आहेत आणि स्वर ही १६ आहेत म्हणून कलेचा अर्थ स्वर असा घेता येतो आणि कलांना वजा केले तर सगळ्या व्यंजनांना अर्थ उरत नाही कारण स्वरांशिवाय त्यांचा उच्चार होऊ शकत नाही. किंवा प्रथम क कार आणि शेवटचा ल कार सगळ्या वर्णांना मागे टाकतो (बाजूला ठेवतात) [संस्कृत भाषेत “ल” ला शेवटचा वर्ण मानला जातो.] म्हणजे प्रथम क कार आणि शेवटचा ल कार यात सगळे वर्ण येतात. क कार आणि ल कार यांच्या संयोगाने कला शब्द तयार होतो. कला ५० आहेत – चंद्राच्या १६ + सूर्याच्या २४ + अग्निच्या १०
एकूण ५०. अक्षरे सुद्धा ५० आहेत . जसे वर्ण शरीर आहेत तर स्वर त्याची कला आहे तसे शक्तिमान आणि शक्ति आहेत. म्हणजे वर्ण शिव तर कला शक्ति आहे म्हणून मंत्राचे प्रत्येक अक्षर शिव-शक्त्यामक आहे.
कला-प्रधान असल्याने सगळे वर्ण कलात्मक आहेत.
श्रीविद्येच्या मंत्रात ४ ठिकाणी अनुस्वार आहे जो चंद्र आणि बिंदु असा लिहिला जातो. अनुस्वार बिंदु आणि चंद्र नाद आहे. ॅ नाद बिंदुच्या वर आहे . प्राचीन काळी चंद्राच्या खाली बिंदु दाखवीत असत जी योग्य पद्धत आहे.
१ – नाद – नादापासुन नादान्ता पर्यंत , ( अर्ध चंद्र , रोधनी , नाद , नादान्त , शक्ति , व्यापिका , समनि , उन्मनी )
२ – बिंदु – अनुस्वार
३ – कला – मंत्राचे वर्ण आणि स्वर.

मंत्राचा चौथा भाग सादाख्य आहे जो नाद बिंदु आणि कलातीत आहे.
श्रीचक्राचेही तीन भाग आहेत
१ – नाद – (आज्ञा चक्रापासून ते सहस्त्रार चक्रापर्यन्त) – भुपूर
२ – बिंदु – शिव चक्र – तीन वृत्ते आणि षोडश व अष्ट दल पद्म
३ – कला – शक्ति चक्र – त्रिकोण , अष्टार , २ दशार आणि चतुर्दशार
सगळे वर्ण १६-१६ च्या गटात विभागता येतात जसे
१) स्वर = १६ २) क ते स पर्यन्त = १६ ३) थ ते स पर्यन्त = १६
क आणि ष ही जोडी – ष ला स मानता येईल आणि मग क आणि स जोडीचा अर्थ दोनदा घेता येईल.
अश्याप्रकारे सगळ्या अक्षरांना तीन भागात लोप होतो. या अनुषंगाने अकथ हा त्रिकोण होतो त्यात ज्येष्ठा , वामा आणि रौद्री शक्ति दाखविल्या जातात तसेच त्यातून इच्छा क्रिया आणि ज्ञान यांचा बोध होतो. “ल” शेवटी असल्याने क काराच्या अधीन समजला जातो. ( ह , क्ष , ल हे तीनही त्रिकोणाच्या आत येतात).आणि यातूनच गुरुमंडळा कडे निर्देश होतो.
असेही म्हणता येईल की सगळी अक्षरे ही १६ नित्यांचे रूप आहे आणि म्हणून प्रत्येक नित्येचे सत्व , रज , तम तीन रुपे असल्याने ४८ अक्षरे होतात.
अ आणि क्ष मिळून अक्ष शब्द तयार होतो ज्याचा अर्थ अक्षमाला होतो या शब्दात सगळे स्वर आणि वर्ण येतात हेच अक्षर स्वरूपिणी श्रीविद्या (कुंडलिनी शक्ति) होय.
श्रीचक्र हे भगवतीचे शरीर आणि भगवती अक्षरस्वरूपिणी असल्याने श्रीचक्र आणि अक्षर समूह एकच आहेत याचे साम्य / ऐक्य खाली दाखविल्या प्रमाणे आहे.
क्ष = बैंदव गृह ( चंद्राचे स्थान आकाश आहे, क्ष हे आकाशाचे द्योतक आहे) = चार शिव चक्रे म्हणजे भू पुर , वृत्त त्रय , षोडशदल , आणि अष्टदल पद्म
१४ स्वर = चतुर्दशार

| | |
|---|---|
| क ख ग घ | दशार युग्म = २० वर्ण |
| च छ ज झ | |
| ट ठ ड ढ | |
| त थ द ध | |
| प फ ब भ | |
| य र ल व | अष्टार ८ वर्ण |
| श ष स ह | |
| ङ ञ ण न म : | त्रिकोण आणि बिंदु - हे पाचही वर्ण अनुस्वार रूप आहेत म्हणून हे बिंदुरूप आहेत, अनुस्वार व विसर्ग तीन बिंदु त्रिकोणाचे द्योतक आहेत |

१३ व्या श्लोकात सांगितलेले सहा आणि चार प्रकारचे ऐक्य (समानता)
सहा प्रकारचे ऐक्य –

१) मंत्र आणि मातृकांचे ऐक्य
२) मातृका आणि श्रीयंत्राचे ऐक्य
३) मंत्र आणि नित्या यांचे ऐक्य
४) मातृका आणि नित्या यांचे ऐक्य
५) मंत्र आणि चक्र यांचे ऐक्य
६) नित्या आणि चक्राचे ऐक्य

चार प्रकारचे ऐक्य

१) मातृका आणि मंत्राचे ऐक्य
२) मंत्र आणि चक्राचे ऐक्य
३) चक्र आणि नित्या यांचे ऐक्य
४) नित्या आणि तिथींचे ऐक्य

मंत्र आणि मातृकांचे , मातृका आणि श्रीचक्र , मातृका आणि नित्या यांचे ऐक्य वर सांगून झालेले आहे. मंत्र आणि चक्र यांचे ऐक्यही आधी सांगून झालेले आहे. उरलेले खाली दाखविले आहे.

| मंत्र | तिथि | वैदिक नाव | नित्या | तत्व | भाग | यंत्राचा भाग |
|---|---|---|---|---|---|---|
| क | १ | दर्शा | कामेश्वरी | शिव | **अग्नि** | त्रिकोण<br>अष्टार<br>अंतर्दशार |
| ए | २ | दृष्टा | भगमालिनि | शक्ति | | |
| ई | ३ | दर्शता | नित्यक्लिन्ना | माया | | |
| ल | ४ | विश्वरूपा | भेरुंडा | शुद्धविद्या | | |
| ह्रीं | ५ | सुदर्शना | वह्निवासिनी | जल | **सूर्य** | बहिर्दशार<br>चतुर्दशार |
| ह | ६ | आप्यायमाना | महावज्रेश्वरी / विद्येश्वरी | तेज | | |
| स | ७ | आप्यायमाना | शिवदूती/रौद्री | वायु | | |
| क | ८ | आप्याया | त्वरीता | मन | | |
| ह | ९ | सूनृता | कुलसुंदरी | पृथ्वी | | |
| ल | १० | इरा | नित्या | आकाश | | |
| ह्रीं | ११ | आपुर्यमाना | नीलपताका | विद्या | | |
| स | १२ | आपुर्यमाना | विजया | महेश्वर | **चंद्र** | शिवाची चार चक्रे |
| क | १३ | पुरयंती | सर्वमंगला | परतत्व | | |
| ल | १४ | पूर्णा | ज्वालामालिनी | आत्म | | |
| ह्रीं | १५ | पौर्णिमा | चित्रा / चिद्रूपा | सदाशिव | | |
| श्रीं | १६ | चिद्रूपा | महात्रिपुरसुंदरी | सदाख्य | **चंद्रकला** | नित्याकला |

नोट:- १ ते ५ अग्नीचा भाग , ६ ते १० सूर्याचा भाग ११ ते १५ चंद्र भाग आहे परंतु ५ आणि ११ सूर्यभाग मानला जातो, अश्याच प्रकारे अंतर्दशाराची १० अग्नी कला सूर्याच्या अंतर्गत मानली जातात.

तिथिंचे पाच भाग – नंदा – १, ६, ११
भद्रा – २ ,७, १२
जया - ३, ८, १३
रिक्ता – ४, ९, १४ = त्याज्य भाग
पूर्णा - ५, १०, १५

***विदेहेन्द्रापत्यं श्रुत इह ऋषिर्यस्य च मनो-** पाठभेद - **विदेहो नैऋत्याः सुत इह ऋषिर्यः स च**
**रयं चार्थः सम्यक्श्रुतिशिरसि तैत्तिर्यकऋउचि ।**
**ऋषिं हित्वा चास्या हृदयकमले नैतमृषिमि-**
**त्यृचाभ्युक्तः पूजाविधिरिह भवत्याः समयिनाम् ॥ २२॥**

**सरळ अर्थ:-** देह रहित इंद्रपुत्र ( किंवा लक्ष्मीच्या शरीरा विरहित पुत्र) कामदेव याचे ऋषी आहेत. या संबंधी मतांतर आहेत. परंतु हा अर्थ तैत्तिरीय ऋचांमधून उत्तम प्रकारे कथन केला आहे. न एतं ऋषी या ऋचेनुसार हृदय कमळात ऋषींचा त्याग करावयास सांगितले आहे. अश्या तऱ्हेने हा पूजा-विधी आहे आणि ही पूजा समयाचार वाल्यांना मान्य आहे.
**व्याख्या:-** श्रुतींमध्ये असे म्हटले आहे की

**जनको ह वैदेह: | अहो रात्रै समाजगाम |**
**पुत्रो निऋत्या वैदेहा | अचेता यश्चचेतना: |**
**स तं मणिमविंदीत | सोनन्गुलीरावयत् |**
**सोग्रीव: प्रत्यमुञ्चत् | सोजिव्हो असंश्र्वत |**
**नैतमृषिं विदित्वा नगरं प्रविशेत | यदि प्रविशेत् |**
**मिथौ चरित्वा प्रविशेत् | तत्संभवस्य व्रतं |** कृष्ण यजुर्वेदियं तैत्तिरीय् आरण्यक १ – ११ वा अनुवाक

आचार्य लक्ष्मीधर सौन्दर्यलहरी वरील टीकेत ३२ व्या श्लोकात सांगतात की
(जनको ह वैदेह: ..... ही ऋचा तैत्तिरीय् आरण्यक प्रथम प्रपाठक दुसऱ्या अनुवाकात तसेच काठक श्रुति तै. ब्राह्मण ३ – १० मध्येही आलेली आहे)
या ऋचांवर भाष्य करतांना आचार्य लक्ष्मीधर लिहितात की
जनको ह वैदेह: | अहो रात्रै समाजगाम |
**जनक** – उत्पन्न करणारा म्हणजे श्रीविद्येचा ऋषी
**वैदेह** - विदेही – कामदेव
**अहोरात्रै** – अहोरात्रात्मक पंचदशी विद्येचे वर्ण = श्रीविद्येचे ऋषी कामदेव आहेत.
पुत्रो निऋत्या वैदेहा |
**निऋत्या** – लक्ष्मी – म्हणजे लक्ष्मीपुत्र कामदेव
सायण भाष्यानुसार निऋति = माया आणि विदेह = चिदात्मक ब्रह्माची मीमांसा
**अचेता यश्चचेतना:** | विदेही म्हणजे अंगरहित असल्याने मन व इंद्रिय रहित अचेतन पण सर्व प्राणिमात्रात व्यापून असतो

**स तं मणिमविंदीत** | स = कामदेव, तं = प्रसिद्ध , मणि = विद्यात्मक रत्न , अविंदीत = जाणले वा पाहिले
म्हणजे सर्वप्रथम कामदेवाने या विद्या रत्नाला पाहिले / जाणले म्हणून कामदेव श्रीविद्येचे ऋषी होत.
आचार्य सदर श्लोकात वेदांच्या आधाराने श्रीविद्येचे ऋषी आणि श्रीविद्येचा पूजा विधी या विषयी सांगत आहेत.
वरील ऋचांमधून स्पष्ट होते की कामदेव श्रीविद्येचे ऋषी होत आणि पूजा विधी बद्दल आचार्य “नैतमृषिं विदित्वा नगरं प्रविशेत “ कडे आपले लक्ष वेधून घेत आहेत. या ऋचेवर भाष्य करतांना आचार्य लक्ष्मीधर लिहितात की

ऋषींना जाणून श्रीचक्रात्मक नगरात प्रवेश करू नका तसेच जाणून घेऊन पुजाही करू नये, म्हणजे मंत्राच्या बाह्य अंगाला जाणून श्रीचक्राची पुजा करू नये आणि अश्याप्रकारे आचार्य बहीर्यागाचा निषेध करतात.
आचार्य लिहितात की

**आंतर पुजायां तादात्म्यानुसंधानात्मिकायाम ऋष्यादिज्ञानम नास्त्येव | उपयोगस्तु दूरत एव | अतो वस्तुसिद्धऋष्यादिपर्युदासमुखेन श्रीचक्रस्य बाह्य पूजनं त्रैवर्णीकै: न कर्तव्यमिती नियम्यते तदुक्त सनतकुमार संहितायाम –**

**बाह्यपुजा न कर्तव्या कर्तव्या बाहयजातिभि: |**
**सा क्षुद्रफलदा नृणाम ऐहिकार्थेकसाधनात ||**
**बाह्यपुजारत: कौला: क्षपणाश्च कापालिका: |**
**दिगंबराष्चेतिहासा वामकास्तंत्रवादिन: |**
**जीवन्मुक्ताश्चरन्त्येते त्रिषू लोकेषू सर्वदा ||**

प्रत्येक मंत्राचे अंतरंग आणि बहिरंग जाणणे आवश्यक आहे. ऋषी , छंद , विनियोग आदी बहिरंग आहेत.
मंत्राचा उच्चार , काळ , वर्णांचे स्थान आदी अंतरंग होय. श्री भास्कर राय आपल्या वरीवस्या रहस्यात या विषयी वर्णन केले आहे. मंत्रजप करतांना बहिरंगापेक्षा अंतरंगाचे ज्ञान आवश्यक आहे. म्हणून आचार्य बहिरंग हे टाकून देण्या योग्य आहेत असे सांगतात.

**[२३]**

**त्रिखण्डस्त्वन्मन्त्रस्तव च सरघायां निविशते**
**श्रियो देव्याः शेषो यत इह समस्ताः शशिकलाः ।**
**त्रिखण्डे त्रैखण्ड्यं निवसति समन्त्रे च सुभगे**
**षडब्जारण्यानी त्रितययुतखण्डे निवसति ॥ २३॥**

**सरळ अर्थ:-** हे माते , तीन भागांनी बनलेला तुझा मंत्र सरघा मध्ये लय पावतो आणि हे देवी तुझा जो उरलेला (शेष) भाग आहे त्यानेच सगळ्या चंद्रकला प्रगट होतात अथवा हे देवी इथे चंद्रकला संपतात आणि तू अमा स्वरूपिणी होतेस. या तीन भागात्मक मंत्रासहित हे भगवती तू त्रिखंडात निवास करतेस आणि सहा कमळांच्या समूहातही ( कमळाच्या वनात) तीन भागांसहित तू निवास करतेस.
**व्याख्या:-** सरघा = अमृताचे स्थान = सहस्त्रार. नादाचा लय सहस्त्रारात होतो म्हणजे मंत्राचे लयस्थान सहस्त्रार आहे. वर्णांचा लय नादात आणि नादाचा लय त्याच्या कारणात म्हणजे सहस्त्रारात होतो.शशिकला ऊर्फ चंद्रकला ही चंद्राची सोळावी कला किंवा अमावास्या आहे. सोळावी कला नित्या आहे कारण चंद्राचे वास्तविक स्वरूप हेच आहे जे सूर्याच्या प्रकाशाने कमी जास्त कलांच्या रूपाने प्रकाशित असते.पंधरा कला क्रमश: पंचदशीच्या पंधरा अक्षरांशी संबधित आहेत आणि सोळावी कला शुद्ध चितीशक्ति , चिन्मात्र , निर्विकल्प समाधी मध्ये विराजित असलेली स्वत: महात्रिपुरसुंदरी आहे कारण बाकीच्या कला कमी जास्त होत असतात परंतु चंद्रबिंब सतत एकसारखे असते म्हणून प्रत्येक कलेला सोळाव्या कलेचा अंश / अंग / भाग समजावे लागेल. प्रत्येक कलेची पूजा आणि ध्यान त्या त्या तिथीप्रमाणे सोळाव्या कलेसोबत केले जाते. सहस्त्रार चक्राच्या मध्ये असलेल्या चंद्रमंडळाला बैंदव स्थान

म्हटले जाते , हे स्थान शुद्ध चिती शक्ति च्या आनंदमयी कलेचे स्थान आहे ज्याला श्री अथवा महात्रिपुर सुंदरी म्हणतात.

**भगवतीचे त्रिखंडात्मक स्वरूप**

| खंड | मंत्राचा भाग | यंत्राचा भाग | सहा कमळांचे भाग | कुंडलिनीचा भाग |
|---|---|---|---|---|
| सोम | शक्ति कूट | शिवाची चार चक्रे | आज्ञा आणि विशुद्ध | सोमकुंडलिनी |
| सूर्य | काम कूट | चतुर्दशार , बहिर्दशार | हृदय , मणीपुर | सूर्य कुंडलिनी |
| अग्नि | वाग्भव कूट | अंतर्दशार अष्टार आणि बिंदुसहित त्रिकोण | स्वधिष्ठान मूलाधार | अग्नी कुंडलिनी |

अंतर्दशाराच्या १० अग्निकला सूर्याच्या अंतर्गत मानली जातात.
षडब्जारण्य = सुषुम्नांतर्गत सहा चक्रे
शेष म्हणजे सोळावे अक्षर – हेच भगवतीचे स्वरूप आहे आणि नित्य कलांमधून बाकीच्या कलांचा उदय होतो.
प्रथम वाग्भव कूट (आग्नेय) – भगवतीचे मुख
दुसरे कामकला कूट (सौर – सूर्य) भगवतीचा कंठ ते कटी पर्यंतचे रूप.
तिसरे शक्ति कूट – (चंद्र खंड) भगवतीच्या कटीच्या खालचा भाग , सृजन शक्तिचे रूप

**[२४]**

**त्रयं चैतत्स्वान्ते परमशिवपर्यङ्कनिलये**
**परे *सादाख्येऽस्मिन्निवसति चतुर्धैक्यकलनात् ।** *पाठभेद - **सादाख्यास्मिन्**
**स्वरास्ते लीनास्ते भगवति कलाश्रे च सकलाः**
**ककाराद्या वृत्ते तदनु चतुरश्रे च यमुखाः ॥ २४॥**

**सरळ अर्थ** :- हे पराशक्ति , हे सर्व जे तीन प्रकारचे आहे सगळे तुझ्या अंतरात परम शिव रूपी पर्यंकावर निद्रिस्त असलेल्या सादाख्य कलेच्या रूपात चार प्रकारचे ऐक्य रूपाने निवास करतात. हे भगवती सगळे स्वर षोडशदल पद्मामध्ये लीन होतात , क कारादि सगळी व्यंजने वृत्तांमद्धे आणि य आदी सगळे चतुष्कोणा मध्ये लीन होतात.
**व्याख्या :-** भगवती त्रिपुरासांगते की तिचा मंत्र यंत्र आदी सगळे तीन भाग असलेले आहेत. त्रिपुरा महिम्न चे टीकाकार त्रिपुरा या शब्दाची फोड करतांना सांगतात की त्रि = तीन , पुरा = प्रथम – ब्रह्मा , विष्णु आणि महेश ऊया त्रिमूर्तीच्या आधी जी विराजमान असते ती.

**तृसुभ्यो मूर्तीभ्य: पुरातनत्वात त्रिपुरा इति** | तथा च
**त्रिमूर्ति सर्गाच्च पुराभवत्वात त्रयीमत्वाच्च तथैव देव्या:|**
**लये त्रिलोक्या अपि पुरकत्वात प्रायोम्बिका या त्रिपुरेति नाम ||**

याच विषयावर श्री गौडपादाचार्य यांचे शक्तिसूत्र - **तत्वत्रयेण भिदा** आहे म्हणजे एकमात्र ब्रह्माचे तीन तत्वांमुळे तीन प्रकार झाले आहेत . सादर भाष्यात लिहिले आहे की तत्व शब्दाचे बरेच अर्थ आहेत उदा. मूर्ति , बीज , जगत , पीठ आणि खंड ------
त्रिपुरार्णव ग्रंथात त्रिपुरा या शब्दाचा अर्थ सुषुम्ना . इडा , पिंगला आहे तर पुर या शब्दाचा अर्थ मन , बुद्धी , आणि चित्त असा आहे यात रहाणारी म्हणून त्रिपुरा झाली तसेच –

**नाडी त्रयम तू त्रिपुरा सुषुम्ना पिंगलात्विडा |**
**मनो बुद्धिस्तथाचित्तं पुरत्र्यमुदा हृतम |**
**तत्र तत्र वसत्येषा तस्मात् त्रिपुरा मता इति |**

म्हणजे या महाशक्ति चे मण्डल , भुपुर , मन्त्र , रूप ,कुण्डलिनी शक्ति (अग्नि , सूर्य , चन्द्र रूपाने) ब्रह्मा , विष्णु , महेश्वर यांच्या सृष्टि साठी . या सगळ्या गोष्टी तीन तीन आहेत म्हणून त्रिपुरा म्हटली जाते . मंडल त्रिकोण व भुपूर हे तीन रेघांनी , मंत्र सुद्धा तीन अक्षरांनी असलेले रूप , ब्राह्मी , रौद्री ,आणि वैष्णवी – पश्यन्ति , परा आणि वैखरी हे सगळे तीन तीन आहेत. सिद्धेश्वरी मताने त्रिपुरा याचा अर्थ खालील प्रमाणे

**ब्रह्माविष्णुमहेशाद्यै स्त्रिदेवैरर्चितापुरा |**
**त्रिपुरेति तदा नाम कथितं देवतै पुरा ||**

सुंदरी-स्तव जरा वेगळ्या प्रकाराने सांगते की

**ब्राह्मी रौद्री वैष्णवीति शक्तयस्तिस्त्र एवहि |**
**पुरं शरीरं यस्या सा त्रिपुरेति प्रकीर्तिता ||**

म्हणजे ब्राह्मी (ब्रह्मा ची शक्ति ) ,रौद्री (रुद्राची शक्ति ) , वैष्णवी (विष्णुची शक्ति ) – या तीन शक्ति ज्या महाशक्ति चा भाग आहे ती त्रिपुरा होय , इथे पुर चा अर्थ शरीर आहे.
काम कला विलास या ग्रंथात त्रिपुरा चा अर्थ अजून जास्त स्पष्ट होतो –

**माता मानं मेयं बिंदुत्रयं भिन्नबीजरूपाणि |**
**धामत्रय पीठत्रय शक्तित्रय भेदवावितान्यपिच || १३ ||**
**तेषूक्रमेण लिंगत्रय तद्वच्च मातृका त्रितयम |**
**इत्थं त्रितयपुरिया तुरियपीठा च भेदनि विद्या || १४ ||**

म्हणजे माता मान आणि मेय ( ईश्वर , विद्या आणि महात्रिपुरसुंदरी ), धामत्रय = वाग्भव , कामराज आणि शक्तिकूट. बिंदुत्रय = रक्त , शुक्ल आणि मिश्र बिंदु. पीठत्रय = पूर्णगिरी , कामरूप आणि जालंधर. शक्तित्रय = इच्छाशक्ति , ज्ञानशक्ति आणि क्रियाशक्ति. लिङ्गत्रय = स्वयंभू लिङ्ग , बाण लिङ्ग आणि शैल (इतर) लिङ्ग
मातृका त्रितयं = तीन मातृका
अश्या प्रकारेया सगळ्या गोष्टी समष्टि रूपाने त्रिपुरा नामक पराशक्ति महा त्रिपुरसुंदरी आहेत.

त्रितय पुरिया – त्रितयानि अवयवानि पुराणि शरीराणी यस्या: सा अतएव तुरीयस्य पीठा त्रिविधात्मक सर्व प्रपंचाविर्भाव तिरोभाव भुरीत्यर्थ: |
म्हणजे त्रिविधात्मक ( त्रितय मात्र ) विश्वातील सगळ्या वस्तु उत्पत्ति आणि विनाश चे मूळ त्रिपुरा (महा त्रिपुरसुंदरी) आहे. ----त्रिपुरामहिम्न (हिंदी टीका) पृष्ट ४ ते ६ पर्यंत.
२) चार प्रकारचे ऐक्य – मंत्र = देवता
यंत्र = देवता
षट कमळ = देवता
कुंडलिनी शक्ति = देवता

३ सादाख्य तत्व – मंत्राचे शेवटचे कूट अर्थात १६ वी कला म्हणजेच चंद्रकला.
सदर श्लोकाच्या शेवटच्या दोन ओळींमध्ये आचार्य मातृकांचे (अक्षरांचे) शिव चक्राशी ऐक्य दाखवीत आहेत.आधी सांगितल्याप्रमाणे मातृका या भगवतीचे स्वरूप आहेत अथवा भगवती मातृकास्वरूप आहे . जसे संगितले आहे की " **सर्व्वं वपुः शब्द मयं पुरारे |** --श्री नीलकंठ दीक्षित यांचे शिव लीलार्णव.

**सा प्रसुते कुंडलिनी शब्दब्रह्ममयी विभुः |**
**शक्तीं ततो ध्वनिस्मरमान्नाद स्मरमन्निरोधिका || १०८ ||**
**ततोर्धेंदु स्मृतो बिंदुः स्मर मा दा सीत परा ततः |**
**पश्यन्ति मध्यकावाची वैखरी शब्द जन्म भु : |**
**इच्छा ज्ञान क्रियात्मासौ तेजोरूपा गुणांबिका || १०९ ||**
**क्रमेणानेन सृजती कुंडलिनी वर्ण मालिकां |**
**अकारादी सकारान्तां द्विचत्वारिंशदत्मिकां || ११० ||**
**पन्चाशद्वार गुणितां पञ्चशद्रुवर्ण मालिकाम् |**
**सुतेद्वर्णताभिन्ना कला रुद्रादिकाम क्रमात् || १११ ||** -- शारदातिलक तंत्र , प्रथम पटल.

वामकेश्वर तंत्रातिल षोडशिकार्णव मध्ये श्री भगवती ला वर्णमाला स्वरूपिणी (मातृका स्वरूपिणी ) मानले आहे. जसे

**अकचादिटतोनद्ध पयशाक्षरवर्गिणिं ज्येष्टाङबाहु पादाग्रमध्य स्वान्त निवासिनिम् |**

अ पासून अकारादि सोळा स्वर तसेच क = क वर्ग , च = च वर्ग , ट = ट वर्ग , त = त वर्ग पासून ऊनद्ध प्रारंभ करून प = प वर्ग . य = य वर्ग आणि श = श वर्ग इत्यादि वर्णान्नि मस्तकापासून ते पायापर्यन्त (आपादतलमस्तकं) चे सर्व अवयव आणि हृदय बनलेले आहे त्या भगवतीला मी प्रणाम करतो.
मातृका या भगवतीचे रूप आहेत म्हणून मातृकांचे शिवचक्राशी ऐक्य दाखविताना आचार्यांना असे म्हणायचे आहे की शक्ति आणि शिव हे एकच आहेत ---
१ – षोडशदल कमळात १६ स्वर येतात
२ – सगळी व्यंजने वृत्तामध्ये येतात
३ – य वर्गाची अक्षरे चतुष्कोनात येतात

**[२५]**

**हलो बिंदुर्वर्गाष्टकमिभदलं शाम्भववपु-**
**श्चतुश्चक्रं *शक्रस्थितमनुभयं शक्तिशिवयोः ।** पाठभेद - शक्तास्थित, शक्तौ स्थित
**निशाद्या दर्शाद्याः श्रुतिनिगदिताः *पञ्चदशधा** पाठभेद - पञ्चदश ता
***भवेयुर्नित्यास्तास्तव जननि मन्त्राक्षरगणाः ॥ २५ ॥** पाठभेद – नित्याप्तास्तव

**सरळ अर्थ** :- ह ल हे बिंदुस्थान आहे (त्रिवृत्त) आणि वर्ण अष्टक अष्टदल पद्म आहे. चार चक्र हे तुझे शांभव शरीर आहे . ( शिवाची चार चक्रे भगवतीच्या शिवस्वरूपाची चार चक्रे होत)
शिव आणि शक्ति पेक्षा वेगळे असे तुझी श्रेष्ठ स्थिती आहे आणि तुझे परम स्वरूप शिव आणि शक्तिच्या पलीकडचे आहे. परब्रह्म हे पुल्लिंगी अथवा स्त्रीलिंगी असे दोन्ही नाही.
श्रुतिच्या अनुसार १५ प्रकारच्या रात्री आणि १५ तिथी तुझी नित्या म्हणजे तुझ्या मंत्राचे अक्षर गण आहेत.
कठीण शब्दार्थ – इभ = गज = हत्ती = आठ ,

शक्र = ऐश्वर्यवान , मोठा (श्रेष्ठ)
शक्रस्थितमनुभयं = शक्र स्थितं अन उभय = श्रेष्ठ स्थिती = दोन्हीपेक्षा वेगळी अथवा दोन्हीच्या विरहित.

**व्याख्या :-** शिव आणि शक्ति वेगळे नाहीत. भगवान शंकराचे शरीर हे शक्तिचेही शरीर आहे , कारण शक्ति शक्तिमान च्या मध्ये आहे म्हणून शक्तिचे शरीर शक्तिमानचे शरीर होय.
शंकराचार्य सौन्दर्यलहरीत म्हणतात की " **शरीरं त्वम शंभो:** "
आधीच्या श्लोकात सांगितल्या प्रमाणे भगवती मातृकास्वरूप (अक्षर) आहे म्हणून सगळी अक्षरे भगवान शंकराचे शरीर होतात.
ह ल हे बिंदुस्थान आहे आणि अ क च ट त प य श आणि क्ष यांचे अष्टदल पद्म होते. या ठिकाणी २४ आणि २५ व्या श्लोकात आचार्य मातृकांचे चार शिव चक्रांशी ऐक्य खाली दिल्याप्रमाणे दाखवितात.

१) भु पुर = य – मुख = य र ल व आणि ह
२) तीन वृत्त = क आदी सगळी व्यंजने आणि ल
३) षोडशदल पद्म = सोळा स्वर
४) अष्टदल पद्म = अष्ट वर्ग

ह = आकाश म्हणून वृत्त ( वर्तुळ ) म्हणजे शून्यवाचक आहे
ल = पृथ्वी म्हणून भु पुर वाचक आहे
या दोहोंचे मिळून बैंदव स्थान होते.

अथवा

ह आज्ञा चक्र आणि ल सहस्त्रार आणि दोन्ही मिळून बिंदुस्थान बनते. सगळ्या अक्षर रूपी कलांचे या शंभूस्थानात लय होतो म्हणजे अक्षररुपिणी शक्तिचे शांभव शरीर ज्या ठिकाणी महानादाचे स्थान आहे त्या सहस्त्रारात लय होते .
ह आणि ल मुळे येथे अकथ त्रिकोण म्हणजे गुरु – त्रिकोण ज्यात सगळ्याचा लय होतो तो घेता येईल. श्रुति मध्ये १५ रात्री म्हणजेच १५ तिथी दाखवल्या आहेत या तिथी तुझ्या नित्या आहेत किंवा कलारूप आहेत आणि या १५ नित्या तुझ्या मंत्रांची १५ अक्षरे आहेत परंतु नित्या या १६ आहेत म्हणून सोळावी नित्या स्वत: भगवती आहे त्यामुळे येथे १५ नित्या आहेत.

**संज्ञानं विज्ञानं प्रज्ञानं जानदभिजानत | संकल्पमानं प्रकल्पमानं मुपकल्प्मानं मुपक्लुप्तं क्लुप्तं | श्रेयो वसीय आयत्संभुतं भूतं इति | चित्र: केतु: प्रभानाभान्संभान |**
**ज्योतिष्मास्तेजस्वाना तप्स्तपन्नभितपन रोचनो रोचमान: शोभना शोभमान: कल्याण इति | दर्शा दृष्टा दर्शता विश्वरुपा सुदर्शना | आप्यायमाना प्यायमाना प्याया सुनृतेरा | आपुर्यमाणा पूर्यमाणा पूरयन्ति पूर्णा पौर्णमासि इति | दाता प्रदातानन्दो मोद: प्रमोद: (१)**
**आवेशयन्निवेशयन्तसंवेशन स शान्त: शान्त: | आभवन्प्रभवन्त्संभवन्संभुतो भूत: इति |**
**प्रस्तुतं विष्टुत्सस्तूतं कल्याणं विश्वरुपम् शुक्रममृतं तेजस्वि तेज: समिद्धं | अरुणं नुमन्मरीचिमदभितपत्तपस्वत् इति | सविता प्रसविता दीप्तो दीपयनदीप्यमान: | ज्वलञ्ज्वलिता तपन्वितपन्त्संतपन | रोचनो रोचमान: शुम्भु: शुम्भमानो वाम इति | सुता सुन्वति प्रसूता सुयमानाभिषुयमाणा | पीती प्रपासंपा तृप्तिस्तर्पयन्ति (२) कान्ता काम्या कामजातयुष्मती कामदुधा इति | -** कृष्ण य.तै. ब्रा. तृतीय काण्डे दशम प्रपाठके प्रथम अनुवाक
**यो ह् वा अहोरात्राणां नाम धेयानि वेद | नाहोरात्रेश्वार्तिमार्छती | संज्ञानं विज्ञानं दर्शा दृष्टेति | एतानुवाकौ पूर्वपक्षस्याहोरत्राणां नाम धेयानि | प्रस्तुत विष्टुतसुता सुन्वतीति | एतावनुवाकावपरपक्षस्याहोरत्राणां नामधेयानि |**
**नाहोरात्रैष्वार्तीमार्च्छति | य एवं वेद (२)** - कृष्णयजुर्वेदीय तै.ब्रा. ३ – १० - १०

वर दिलेल्या श्रुतिंमधे तिथिंची नावे आणि फ़लश्रुति दिली आहे.

**स यो ह् वा एता मधुकृतश्च मधुवृषांश्च वेद कुर्वन्ति हास्यैता अग्नो मधु | नास्येष्टापूर्त धयन्ति अथ यो न वेद न हास्यैता अग्नो मधुकुर्वन्ति धयन्त्यस्येष्टापुर्तम ||** तै.ब्रा. ३ – १० – १

**दर्शाद्या श्रुतिनिगदिता पञ्चदशधा** या उक्तिनुसार आचार्य वर दिलेल्या श्रुतिंकडे संकेत करतात की यात दर्शाद्या: तिथींची नावे आहेत याचाच अर्थ दर्शाद्या चा अर्थ तिथी होय.
प्रत्येक नित्या तिथीचे रूप आहे आणि यांची पूजा तिथी क्रमाने होते उदा. प्रथम नित्येची पूजा प्रतिपदेला इ.

| तिथी | श्रुतिनुसार तिथीची नावे | संबंधित नित्या | मंत्राचे अक्षर | खण्ड |
|---|---|---|---|---|
| १ | दर्शा | कामेश्वरी | क | अग्नी खण्ड |
| २ | दृष्टा | भगमालिनि | ए | |
| ३ | दर्शता | नित्यक्लिन्ना | ई | |
| ४ | विश्वरूपा | भेरुंडा | ल | |
| ५ | सुदर्शना | वह्निवासिनी | ह्रीं | |
| ६ | आप्यायमाना | महावज्रेश्वरी / विद्येश्वरी | ह | सूर्य खण्ड |
| ७ | आप्यायमाना , (प्यायमाना) | शिवदूती/रौद्री | स | |
| ८ | आप्याया , प्याया | त्वरीता | क | |
| ९ | सुनृता | कुलसुंदरी | ह | |
| १० | इरा | नित्या | ल | |
| ११ | आपुर्यमाणा | नीलपताका | ह्रीं | |
| १२ | पूर्यमाणा | विजया | स | चंद्र खण्ड |
| १३ | पुरयंती | सर्वमंगला | क | |
| १४ | पूर्णा | ज्वालामालिनी | ल | |
| १५ | पौर्णमासी | चित्रा/ चिद्रूपा | ह्रीं | |
| १६ | अमा | महात्रिपुरसुंदरी | श्रीं | |

पंधरा नित्या या पंधरा कला आहेत आणि त्या मंत्रांची पंधरा अक्षरे आहेत. इथे आचार्य नित्या , तिथी आणि मंत्राक्षरे यांचे ऐक्य दाखविले आहे.

**[२६]**

**इमास्ताः षोडश्यास्तव च सरघायां शशिकला**
**स्वरूपायां लीना निवसति तव श्रीशशिकला ।**
**अयं प्रत्याहारः श्रुत इह कलाव्यञ्जनगणः**
**ककारेणाकारः स्वरगणमशेषं कथयति ॥ २६॥**

सरळ अर्थ :- हे श्री चंद्रकले ! या सगळ्या चंद्रकला सोळाव्या कलेत सरघा मध्ये (सहस्त्रार ) लीन होऊन वास करतात . ही क करादी सर्व व्यंजने आणि स्वर एकत्रितपणे कला अशी संबोधिली जातात आणि यांचा तुझ्या सोळाव्या कलेत लय होतो.
व्याख्या:- सोळा स्वर सोळा कला आहेत आणि सगळी व्यंजने स्वरांच्या आधाराने आहेत , या व्यंजनांचा सोळा कलांमध्ये लय होतो. २५ व्या श्लोकात १५ तिथी , १५ नित्या आणि मंत्रांची १५ अक्षरे दाखविली

आहेत ते सगळे भगवतीच्या १६ व्या कलेत लीन होऊन जातात कारण तेच भगवतीचे वास्तविक स्वरूप आहे. सर्व नित्या १६ व्या नित्येत लय पावतात जी स्वत: भगवती महात्रिपुरसुंदरी आहे. तिथी अमावस्येत विलीन होतात , अमावास्या ही भगवती महात्रिपुरसुंदरी आहे. मंत्राची १५ अक्षरे १६ व्या अक्षरात विलीन होतात. जप करतांना एका एका अक्षराचे दुसऱ्या अक्षरामध्ये लय केला जातो. अश्या रीतीने सगळ्या अक्षरांचा १६ व्या अक्षरात , सहस्त्रारात लय होतो. हे सोळावे अक्षर श्री बीज आहे आणि ते महा त्रिपुरसुंदरीचे स्वरूप आहे. या श्लोकात आचार्य असे संगत आहेत की अक्षर , तिथी आणि नित्या या सगळ्यांचं लय भगवती मध्ये होतो अर्थात १६ वी कला भगवतीचे परम स्वरूप आहे ज्यामधे या सगळ्याचा लय होतो. इथे असे म्हणता येईल की योग्याने सहस्त्रार चक्रा मध्ये भगवतीचे ध्यान केले पाहिजे. भगवतीच्या परा रुपाचे ध्यान हे श्रेय ( गंतव्य ) आहे . यातून आचार्य असे दाखवितात की समयाचारी साधकांनी खालच्या चक्रांवर ध्यान करू नये.आचार्य या ठिकाणी असे संगत आहेत की भगवती मातृका (अक्षर) स्वरूप आहे , वर्णमालेची सगळी अक्षरे तिचीच अंगे आहेत आणि ती स्वत: बिंदु स्वरूपिणी आहे ह ल बिंदूचे स्वरूप आहे ह हे विसर्ग असल्याने बिंदु स्वरूप आहे तर ल भूमी बीज असून पृथ्वी गोल असल्याने ल सुद्धा बिंदुरूप आहे. या सगळ्याचा लय महाबिंदू मध्ये होतो जिथून नादाची उत्पत्ति होते आणि नादाचे उदय स्थान सहस्त्रार आहे.
सरघा हा वैदिक शब्द आहे -- इय वाव सरघा -- तै.ब्रा. ३ – १० – १०

## [२७]

**क्षकारः पञ्चाशत्कल इति *हलो बैंदवगृहं** - पाठभेद - **हरो**
***ककारादूर्ध्वं स्याज्जननि तव नामाक्षरमिति** । - पाठभेद - **क्षकारा**
**भवेत्पूजाकाले मणिखचितभूषाभिरभितः**
**प्रभाभिर्व्यालीढं भवति मणिपूरं सरसिजम् ॥ २७॥**

सरळ अर्थ :- क्ष कार ५० वी कला आहे म्हणून ते ह ल (शंकर) रूपी बैंदव गृह आहे . हे जननी ! क कार हा सगळ्या व्यंजनांच्या वर (क्ष कार च्या वर) तुझ्या नावाचे अक्षर आहे (श्री बीज) किंवा क काराच्या वर तुझ्या नावाचे अक्षर म्हणजे क्ष कार हे तुझे स्वरूप आहे. पूजेच्या समयी मणीपुर कमळात मण्याने युक्त दिव्य प्रभेने युक्त असे तुझे स्वरूप आहे .

**व्याख्या** :-**ॐ क्षङ्कार परापरतत्त्वज्ञापक परञ्ज्योतीरूप शिखामणौ प्रतितिष्ठ ।** अक्षमालिकोपनिषद

अक्षमालिकोपनिषदात क्ष काराला परात्पर तत्वाचे ज्ञान करून देणारा म्हणजे परात्पर तत्व आणि परम ज्योतीस्वरूप म्हटले आहे म्हणून क्ष कार हा भगवतीचे स्वरूप आहे. ज्याप्रमाणे चंद्राच्या सगळ्या कला १६ व्या कलेत लय पावतात त्याप्रमाणे अक्षर स्वरूपिणी महामाया क्ष कारात लय पावते. गुरु – त्रिकोण हे बैंदव स्थान आहे कारण बैंदव स्थान सहस्त्रारात आहे. ह ल आणि क्ष या त्रिकोणात आहेत म्हणजे हे ह ल क्ष रूपी बैंदव गृह आहे. याआधी कथन केल्याप्रमाणे योग्यांना खालची दोन चक्रे ( मूलाधार आणि स्वधिष्ठान ) त्याज्य आहेत आणि समयाचार मतानुसार भगवतीचे ध्यान मणीपुर चक्रापासून आरंभ होते (श्लोक १६ पहा). योगी जेव्हा मणीपुर चक्रात भगवतीचे ध्यान करतो तेव्हा भगवती परम प्रकाशमयी स्वरुपात प्रगट होते , असेही म्हणता येईल की योग्याने मणीपुर चक्रात परम प्रकाशमय स्वरूपाचे ध्यान करावे मंत्राची अक्षरे हेच मणी आहेत आणि मंत्र भगवतीचे शरीर आहे म्हणून मण्यांनी खचित असे म्हटले आहे , किंवा जलबिन्दू हे मणिरूप आहेत म्हणून भगवती मणीमय रूपात प्रगट होते.

[२८]

**वदन्त्येके वृद्धा मणिरिति जलं *तेन निबिडं** - पाठभेद - लीननिबिडं
**परे तु त्वद्रूपं मणिधनुरितीदं समयिनः ।**
**अनाहत्या *नादः प्रभवति सुषुम्णाध्वजनितं**- - पाठभेद - सादः
**स्तदा वायोस्तत्र प्रभव इदमाहुः समयिनः ॥ २८॥**

**सरळ अर्थ :-** जुन्या लोकांच्या एका मतानुसार मणीपुर चक्रात जळाला मणी असे म्हटले आहे आणि मणीपुर चक्र मण्यांनी ओतप्रोत आहे. परंतु समयाचार मार्गीय तुझ्या रूपाला इंद्रधनुष्यरूपी मानतात. त्यांचे असेही म्हणणे आहे की अनाहत चक्रात जो नाद आहे तो सुषुम्नेत उत्पन्न झालेल्या वायुमुळे उत्पन्न होतो.
**व्याख्या :-** स्वधिष्ठान चक्रामधील जळ जेव्हा अनाहत चक्रामधील सूर्याच्या उष्णतेने वाफ बनते आणि वर जाते आणि मणीपुर चक्रात मेघरूपाने रहाते. मेघ हे विजेचे स्थान आहे आणि वीज अग्निचे स्वरूप आहे. श्रुतिमध्ये सांगितल्याप्रमाणे --- **अंतरीक्षगतो वन्हीर्वैद्युत** - योगशिखोपनिषद ५ – ३२
म्हणून मणीपुर चक्र अग्नी आणि जळ दोन्हीचे स्थान आहे. जेव्हा या मेघांवर सूर्याची किरणे पडतात तेव्हा इंद्रधनुष्य दिसते अश्याप्रकारे मणीपुर चक्रात भगवती इंद्रधनुष्य रूपात प्रगट होते. वायु हे नादाच्या उत्पत्ति चे कारण आहे आणि अनाहत चक्र हे नादाचे स्थान आहे कारण वैखरी वाणी अनाहताच्या वर प्रगट होते.

[२९]

**तदेतत्ते संवित्कमलमिति सञ्ज्ञान्तरमुमे**
**भवेत्संवित्पूजा भवति कमलेऽस्मिन्समयिनाम् ।**
**विशुद्ध्याख्ये चक्रे वियदुदितमाहुः समयिनः**
**सदापूर्वो देवः शिव इति हिमानीसमतनुः ॥ २९॥**

**सरळ अर्थ :-** हे उमे ! तुझ्या संवित (हृदय) कमळा मध्ये समयाचार मार्गीय संवित पूजा करतात.विशुद्ध आकाशाचा उदय होतो असे समयाचारी लोकांचे म्हणणे आहे या ठिकाणी प्रथम असलेले देव म्हणजे शिव च्या नावा पुर्वी सदा लागते म्हणून त्यांना सदाशिव असे म्हणतात आणि त्यांचे शरीर हिमवत म्हणजे श्वेत वर्णाचे आहे.
**व्याख्या :-** २८ व्या श्लोकात आचार्यांनी मणीपुर चक्राचे वर्णन केल्यावर शेवटच्या दोन ओळींमद्धे अनाहत चक्राबद्दल वर्णन केले आहे या श्लोकात पुढे ते असे सांगतात की या चक्राचे दुसरे नाव संवित कमळ असेही आहे सदर नावाविषयी आचार्य सांगतात की समयाचार मार्गीय संवित पुजा करतात म्हणून याला संवीत कमळ म्हणतात. मानसिक पूजा आणि ध्यान हृदय कमळात होते.
संवित याचा अर्थ चैतन्य असा होतो हृदय कमळ हा चैतन्याची पाहिली पायरी आहे या ठिकाणी भगवतीची उपासना चिती रूपात केली जाते. या ठिकाणी पोहोचल्यानंतर साधकाचे भाव जागृत होतात आणि महाराणी भगवतीचे दर्शन त्याला होते.
संवित याचा अर्थ ज्ञान असा होतो . आधीच्या श्लोकात आचार्यांनी मेघांची उत्पत्ति कशी होते ते सांगितले. मेघांमध्ये अग्नी विजेच्या रूपात असतो , मेघांमध्ये नाद उत्पन्न होतो कारण मेघांमध्ये विजेच्या चमकण्याने गर्जन होऊन तो ध्वनि नादात रूपांतरित होतो. या नादाचे प्रथम ज्ञान अनाहत चक्रात होते आणि येथे भावाची अभिव्यक्ती होते आणि हा भाव विशुद्ध चक्रात नाद अथवा वैखरी वाणी च्या रूपात प्रगट होतो.

अनाहत चक्रानंतर आचार्य आता विशुद्ध चक्राचे वर्णन करीत आहेत. समयाचार मार्गीयांच्यानुसार विशुद्ध चक्र आकाश तत्वाचे स्थान आहे म्हणजे या ठिकाणी आकाश तत्व उदयास येते आणि हे सगळ्या देवांच्या आधी असणाऱ्या भगवान सदाशिवाचे स्थान आहे.

**विशुद्धे राजते तत्र सदाशिवा: शक्त्यासह: |**
**आज्ञायंतू शिवज्योती सहस्त्रारे ह्यनामय: ||**

**[३०]**

**त्वदीयैरुद्योतैर्भवति च विशुद्ध्याख्यसदनं**
**भवेत्पूजा देव्या हिमकरकलाभिः समयिनाम् ।**
**सहस्रारे चक्रे निवसति कलापञ्चदशकं**
**तदेतन्नित्याख्यं भ्रमति सितपक्षे समयिनाम् ॥ ३०॥**

**सरळ अर्थ :-** तुझ्यातून उदयास आलेल्या ज्योतिमुळे या चक्राला विशुद्ध नावाने ओळखले जाते. हे भगवती ! समयाचार मार्गीय या ठिकाणी चंद्रकलांच्या रूपात तुझी पूजा करतात. समयाचार मार्गीयांच्यानुसार सहस्त्रार चक्रामध्ये चंद्राच्या पंधरा कला या पंधरा नित्यास्वरूप आहेत आणि या तिथी शुक्ल पक्षात भ्रमण करतात म्हणजेच पंधरा नित्या या शुक्ल पक्षातील पंधरा तिथी आहेत.
**व्याख्या :-** २९ व्या श्लोकात शेवटच्या दोन ओळींमधे आचार्यांनी विशुद्ध चक्राचे वर्णन करण्यास प्रारंभ केला आहे आणि त्यासंबंधी ते म्हणतात की , हे माते तुझ्या प्रभेने प्रकाशमान झालेले किंवा तुझ्यातून प्रगट झालेल्या ज्योतीच्या प्रकाशाने प्रकाशमान झाल्याने हे विशुद्ध चक्र आहे यातील सोळा पाकळ्या चंद्राच्या सोळा कलांचे प्रतिनिधित्व करतात आणि यामुळे या चक्रात भगवती राजराजेश्वरीची पूजा चंद्रकलांच्या रूपात केली जाते.
विशुद्ध चक्राचे वर्णन करतांना आचार्य शंकर भगवतपाद आपल्या सौंदर्यलहरी मधे लिहितात की...

**विशुद्धौ ते शुद्धस्फतिक विशदं व्योम-जनकं**
**शिवं सेवे देवीमपि शिवसमान-व्यवसिताम् ।**
**ययोः कान्त्या यान्त्याः शशिकिरण्-सारूप्यसरणे**
**विधूतान्त-र्ध्वान्ता विलसति चकोरीव जगती ॥ ३७ ॥**

२९ व्या श्लोकात सांगितले आहे की ज्याचा आपण अनुभव घेऊ शकतो अश्या नादाची अभिव्यक्ती अनाहत चक्रात भावाच्या रूपात होते आणि या भावांना आपण वैखरी वाणीच्या रूपात प्रगट करतो म्हणजेच विशुद्ध चक्रात भाव हे वाणीचे रूप धरण करतात.
भगवती महामाया कुंडलिनी  मूलाधारातून वर येत असतांना वेगवेगळ्या रूपात प्रगट होते. विशुद्ध चक्रात ती वैखरी वाणीच्या रूपात असते. मंत्र हे देवतेचे शरीर असल्याने विशुद्ध चक्रात भगवती मंत्रस्वरूपात प्रगट होते.मंत्राची सोळा अक्षरे हे विशुद्ध चक्राचे सोळा आरे आहेत आणि मंत्राचे प्रत्येक अक्षर चंद्रकिरण सदृश आहेत कारण भगवती स्वत: चंद्रकला आहे. या विषयी माझे परमपूज्य गुरुदेव लिहितात की...
विशुद्ध चक्राच्या सोळा पाकळ्यांवर पूर्वेकडून अग्नी , दक्षिण , नैऋत्य , पश्चिम , वायव्य , उत्तर आणि ईशान्य या क्रमानुसार सोळा अक्षरांची भावना केली जाते. सहस्त्रारातील पूर्ण कलेच्या बिंबाने

आज्ञाचक्रातून विशुद्ध चक्रावर चंद्राच्या कलेनुसार त्या चमकतात. अश्याच प्रकारे चिती शक्तिचा संबंध १६ नित्या – कलांशी असतो आणि त्यांचा संबंध मंत्राशी , मंत्राचा संबंध सुषुम्नाशी , सुषुम्नेचा संबंध मातृकांशी , मातृकांचा संबंध
इडा – पिंगलेशी , आणि तत्संबंधी सूर्याग्नि चंद्राशी आणि या सगळ्याचा संबंध श्रीचक्राशी आहे जे श्रीचक्र देह (पिंड) आणि विराट देह (ब्रह्मांड) यांचेशी आहे. या सगळ्याचा पारस्पारिक संबध समजून घ्यायला हवा.
शेवटच्या दोन ओळींमधे आचार्य शुक्ल पक्षातील तिथी आणि नित्या यांच्यातील समानता दाखवतात. नित्यांचा संबंध मंत्राच्या अक्षरांशी आहे ( अर्थात मंत्राची अक्षरे हे नित्यांचे रूप आहे ) या विषयी २५ व्या श्लोकाच्या व्याख्येत लिहिलेले आहे.

**[३१]**

**अतः शुक्ले पक्षे *प्रतिदिनमिह त्वां भगवतीं** पाठभेद - **प्रतिदिनमहस्त्वां**
**निशायां सेवन्ते निशि चरमभागे समयिनः ।**
**शुचिः स्वाधिष्ठाने रविरुपरि संवित्सरसिजे**
**शशी चाज्ञाचक्रे हरिहरविधिग्रन्थय इमे ॥ ३१॥**

**सरळ अर्थ:-** अश्या रीतीने समयाचार मार्गीय शुक्ल पक्षातील मध्यरात्री तुझी पूजा करतात. स्वाधिष्ठानात अग्नी , अनाहतात सूर्य आणि आज्ञाचक्रात चंद्राची पूजा करतात, या हर , हरी आणि विधी ग्रंथी आहेत.
**व्याख्या:-** तिसाव्या श्लोकात सांगितल्यानुसार शुक्ल पक्षाच्या पंधरा तिथी या नित्या स्वरूप आहेत म्हणून भगवतीची पूजा शुक्ल पक्षातच होते. कुंडलिनी शक्तीचे जागरण शुक्ल पक्षातच केले जाते कारण शुक्ल पक्षात अमृत हे जास्त असते. शुक्ल पक्षात चंद्रकडून अमृत स्त्रवू लागते. सूर्यकिरणांचा दाह हरण करून ( कमी करून ) चंद्र शुक्ल पक्षात ज्योत्स्ना (प्रकाश) प्रदान करतो. चंद्र रात्री असतो म्हणून चंद्रकलेची उपासना रात्रीच करतात. म्हणून योग्याने रात्रीच्या शेवटच्या प्रहरात कुंडलिनी साधना करावी जसे तै.ब्रा. ३ – १० – १० मध्ये संगितले आहे की
**ता मधुकृत:** ह्याची व्याख्या करतांना श्री आचार्य लक्ष्मीधर लिहितात –
**ता: रात्रय: मधु कुरवन्तिति मधुकृत: | रात्रिष्वेव मधून: संग्रह इति लोक प्रसिद्धि | रात्रावेव चन्द्रकलारुपाया: श्री विद्याया: अनुष्ठानम्, न च दिवसे इति उपदेशः |**

शेवटच्या दोन ओळीत आचार्यांनी तीन ग्रंथींचे स्थान सांगितले आहे.

**स्वाधिष्ठान चक्र -- विष्णु ग्रंथी**
**अनाहत चक्र -- रुद्र ग्रंथी**
**आज्ञा चक्र -- ब्रह्म ग्रंथी**

आचार्यांनी सांगितलेला हा क्रम वेगळा असून इतर कुठे याचा संदर्भ सापडत नाही. ललिता सहस्त्रनामात याचे वर्णन खाली दिल्याप्रमाणे आहे.

**मूलाधारैकनिलयाय ब्रह्मग्रन्थिविभेदिनी |**
**मणिपूरान्तरुदिता विष्णुग्रन्थिविभेदिनी |**
**आज्ञाचक्रान्तरालस्था रुद्रग्रन्थिविभेदिनी |**

आचार्यांनी या ठिकाणी जो क्रम सांगितला आहे की प्रथम विष्णु ग्रंथी , त्यानंतर रुद्र आणि शेवटी ब्रह्म ग्रंथी.

हा क्रम वेदाच्या आधारे असावा असे वाटते. स्वाधिष्ठान चक्राची देवता विष्णु आहे. रुद्र सूर्यरूप मानले आहेत कारण सूर्य विष सृजन करणारे असल्याने संहारक मानले जातील. आज्ञाचक्र चंद्राचे स्थान आहे आणि चंद्रापासून चंद्र किरण आणि नित्यांची उत्पत्ति होते. आज्ञा चक्र हेच मन आणि आत्मतत्वाचे स्थान आहे यातूनच सगळ्या तत्वांची उत्पत्ति होते म्हणून बहुतेक आज्ञाचक्राला ब्रह्म ग्रंथी म्हटले आहे.
योग शास्त्राच्या बऱ्याच  ग्रंथांमधून दिलेला ग्रंथींचा क्रम या प्रमाणे आहे
१ – रुद्र ग्रंथी
२ – विष्णु ग्रंथी
३ – ब्रह्म ग्रंथी
आचार्यांच्या अनुसार मंत्राचे प्रथम आणि दुसरे कूट अग्नी आणि सूर्य खंडाच्या मध्ये असलेली हृ लेखा ही विष्णू ग्रंथी आहे ( यज्ञौ वै विष्णु या अनुसार विष्णु अग्नी खंडाची देवता झाले ) , सूर्य आणि चंद्र खंड यामधे म्हणजे दुसरे कूट आणि तिसरे कूट यामध्ये असलेली हृ लेखा रुद्र ग्रंथी आहे तर तिसऱ्या कुटाच्या शेवटी असलेली हृ लेखा ही ब्रह्म ग्रंथी होय. २३ व्या श्लोकाप्रमाणे मंत्राचा तिसरा भाग (चंद्र खण्ड ) भगवतीच्या कटीप्रदेशाखालील भाग आहे आणि सृजन शक्तिचे चे रूप असल्याने ही तिसरी हृ लेखा ब्रह्म ग्रंथी आहे.
ग्रंथीत्रय या विषयी माझे परमपूज्य गुरुदेव श्री १००८ श्री स्वामी विष्णुजी तीर्थ लिहितात की
ग्रंथी म्हणजे गाठ. दोन भिन्न वस्तूंना जोडण्यासाठी गाठीचे काम असते आणि काहीवेळा एकट्या वस्तूतसुद्धा गुरफटल्यामुळे गाठ पडू शकते जसे केस आणि धाग्यामद्धे गाठ पडते. अध्यात्म विषयातील ग्रंथींच्या स्वरूपाबद्दल गोस्वामी तुलसीदास या शब्दात म्हणतात की

**जड चेतनहि ग्रंथी परि गई , जदपि मृषा छुटत कठिनई |**

म्हणजे जड प्रकृती आणि चेतन परमात्मा  यांची गाठ पडली आहे ती खोटी खोटी असली तरी मोठ्या मुश्किलीने सोडविली जाते .
आत्मा हा शुद्ध चेतना स्वरूप निर्विकारी आहे तर देह , इंद्रिय , तसेच मन – बुद्धी यांचे आवरण हा प्रकृतीचा विकार आहे. या दोहोंची गाठ पडणे अशक्य आहे पण परंतु दोघाचे वेगवेगळ्या स्तरावर अश्या प्रकारचे तादात्म्य दिसून येते की वेगळे असल्याचे ज्ञान विरळा दिसून येते. देहाच्या अभिमानाने म्हणजे देहभावामुळे आत्मा स्व स्वरूप विसरून देहाधिष्ठीत बनून रहातो. दार्शनिक दृष्टीने याला मिथ्या प्रतीति (अध्यास)ला मिथ्या ज्ञान अथवा (विपर्यय) नेमके विरुद्ध ज्ञान असे म्हणतात.
श्री मदशङ्कर भगवत्पाद यांनी अध्यास याचा अर्थ सांगितलं आहे की --- आत्मा अहं अथवा अस्मत् पद आहे आणि प्रकृति युष्मत् पद आहे. पहिले पद हे विषयी आहे आणि दुसरे पद विषय आहे. दोन्ही प्रकाश आणि अंधार असे विरुद्ध स्वभावाचे आहेत. परंतु दोन्ही एकमेकांच्या भावात मिसळून जातात तसेच विषयी असा आत्म्यात युष्मत् प्रत्ययाची प्रचीती तसेच समकालीन विषय आणि त्यांच्या बद्दलची आसक्ती , आणि याच्या विरुद्ध , विषय म्हणजे अस्मत् पदामध्ये (प्रकृती) आत्म्याचे धर्म आणि धर्माचा आभास दिसू लागतो. या इतरेतर म्हणजे एकमेकांच्या परस्परविरोधी मिश्रणाच्या खोट्या ज्ञानाला अध्यास म्हणतात. हे स्मृति रूप आहे आणि या आधी पाहिलेल्या पदार्थाचे अन्य ठिकाणी भासात्मक उत्पन्न होणे आहे. पूर्व मीमांसा मध्ये अध्यासाला अख्याति , वैशेषिक आणि नैयायिक याला अन्यथा ख्याति , शून्यवादी - असत ख्याति, बौद्ध - आत्मख्याती, सांख्यवादी – सदअसत ख्याति  आणि वेदान्तवादी याला अनिर्वचनीय ख्याति म्हणतात. परंतु या सिद्धांतात सगळ्यांचे एकमत असे आहे की एका वस्तुचे दुसऱ्या ठिकाणी असणारा मिथ्या अवभास अथवा असल्याचा भास फक्त आहे.
वर दिलेल्या मिथ्या भासापासून मुक्ति आणि आत्मतत्वाच्या शुद्ध चेतन ब्रहमस्वरूपाच्या ज्ञानाला " ज्ञान " असे म्हणतात. आत्म्यामधे देहभाव आणि देहामध्ये आत्माध्यास या पासून मुक्त होणे म्हणजे जड-चेतन ग्रंथीची गाठ सोडविणे होय,याचे सुंदर उदाहरण श्री गोस्वामींनी ज्ञानदिपक या ग्रंथात केले आहे.
आध्यात्मध्यास प्रकृतीच्या तीन गुणांच्या योगाने तीन स्तरांवर दिसून येतो. सत्व गुणाच्या अध्यासाने

विष्णुग्रंथी , रजोगुणच्या अध्यासाने ब्रह्मग्रंथी आणि तमोगुणाच्या अध्यासाने रुद्रग्रंथी म्हणतात.स्थूल देहध्यासाला रुद्रग्रंथी , इंद्रियजनित अध्यासाला ब्रह्मग्रंथी तर अंत:करणाच्या च्या योगे उत्पन्न झालेल्या अध्यासाला विष्णुग्रंथी म्हणतात. रुद्रग्रंथी चे स्थान मूलाधारात ,विष्णुग्रंथी चे स्थान हृदयात आणि ब्रह्मग्रंथीचे स्थान आज्ञाचक्रात सांगीतले जाते परंतु ललिता सहस्त्रनामात या तीन ग्रंथीचे वर्णन या प्रकारे आहे ----

**मूलाधारैकनिलया ब्रह्मग्रन्थि विभेदिनी | मणिपूरान्तरुदिता विष्णुग्रन्थि विभेदिनी ||८९**

**आज्ञाचक्रान्तरालस्था रुद्रग्रन्थि विभेदिनी | सहस्रारांबुजारूढा सुधासाराभिवर्षिणी || ९० ||**

भूत जय झाल्यावर रुद्रग्रंथी , इंद्रिय जय झाल्यावर ब्रह्मग्रंथी आणि मनोजय झाल्यावर विष्णुग्रंथी चा वेध होतो. भूतजय झाल्यावर मधुमती , इंद्रिय आणि मनोजय झाल्यावर मधुप्रीतिका भूमिकेचा उदय होतो. याच्या आधी कुंडलिनी जागृत झाल्यावर रज आणि तमो गुण मिश्रित सत्व गुण भूमिकेचे नाव प्रारंभ कल्पिका आणि ऋतंभरा प्रज्ञेचा उदय झाल्यावर शुद्ध सत्वगुण प्रधान भूमिकेचे नाव मधुमती भूमिका आहे.
(पहा – योगदर्शन – विभूति पाद – सूत्र ५१ वरील व्यास भाष्य ) --- सौंदर्य लहरी हिंदी अनुवाद दुसरी आवृत्ती पृष्ट २१९ ते २२२.

**[३२]**

**कलायाः षोडश्याः प्रतिफलितबिम्बेन सहितं**
**तदीयैः पीयूषैः पुनरधिकमाप्लावितततनुः ।**
**सिते पक्षे सर्वास्थिथय इह कृष्णेऽपि च समा**
**यदा चामावास्या भवति न हि पूजा समयिनाम् ॥ ३२॥**

**[३३]**

**इडायां पिङ्गल्यां चरत इह तौ सूर्यशशिनौ**
**तमस्याधारे तौ यदि तु *मिलितौ सा तिथिरमा ।** पाठभेद - **तुलिती**
**तदाज्ञाचक्रस्थं शिशिरकरबिम्बे रविनिभं**
**द्दढव्यालीढं सद्विगलितसुधासारविसरम् ॥ ३३॥**

**सरळ अर्थ :-** हे भगवती तुझ्या सोळाव्या (सहस्त्रारस्थ) कलेपासुन आणि तिच्यामुळे दिसणाऱ्या बिंबातून (आज्ञाचक्रस्थ) अमृत स्त्राव होतो आणि परत परत होत रहातो ज्यामुळे संपूर्ण शरीर न्हाऊन जाते. ही क्रिया शुक्ल आणि कृष्ण पक्षात समान होते परंतु अमावास्येला होत नाही म्हणून समयाचारी साधक अमावास्येला पूजा करत नाही.
इडा व पिंगला नाड्यांमध्ये सूर्य आणि चंद्र फिरत असतात आणि फिरता फिरता तमोरूप असलेल्या मूलाधारात त्यांची भेट होते यालाच अमावास्या तिथी म्हणतात. आज्ञा चक्रातिल चंद्रामुळे परावर्तीत झालेल्या सूर्य प्रकाशाची शीतल किरणे अत्यंत द्दढतेने अमृत धारांचा वर्षाव करतात.

**व्याख्या:-** षोडशी कला म्हणजे मंत्राचे सोलावे अक्षर हीच स्वत: भगवती राजराजेश्वरी महात्रिपुरसुंदरी आहे. हिचे स्थान सहस्त्रार आहे आणि हिच्याच प्रकाशने सगळ्या कला प्रकाशित होतात ,या संदर्भात माझ्या परम पूज्य गुरुदेवांनी लिहिले आहे की ---

१६ अक्षरांचा हा मंत्र षोडशी विद्या या नावाने प्रसिद्ध आहे. १६ अक्षरांना १६ नित्या म्हटले पाहिजे. वास्तविक शेवटचे लक्ष्मी बीज हेच नित्या आहे कारण ती परा कला आहे आणि त्यामुळेच सगळी विद्या श्रीविद्या समजली जाते. ही शुद्ध चिती शक्तिस्वरूपा सहस्त्रारास्थित चंद्राची १६ वी कला आहे , ही कला विशुद्ध चक्राच्या १६ पाकळ्यांवर प्रतिबिंबीत झालेली असते. पहिल्या कलेचा प्रकाश पूर्व दिशेने अश्या क्रमाने आरंभ होऊन १६ व्या कलेच्या ईशान्य कोणाच्या पाकळीपर्यन्त असतो. १६ व्या कलेच्या आधीन बाकीच्या सर्व कला वाढतात आणि क्षय होतात त्या परतंत्र आहेत अश्या प्रकारे या विद्येचे नाव श्रीविद्या पडले आहे.
शुक्ल आणि कृष्ण पक्षातील १४ तिथी आणि पौर्णिमा आणि अमावास्या मिळून १६ चंद्रकला आहेत, या सगळ्या कला शुक्लपक्षात सूर्यामुळे होतात आणि कृष्णपक्क्षा मधे सूर्यात विलीन होतात. जसे पहिली कला शुक्लपक्षातील उदय होऊन कृष्णपक्षातील प्रतिपदेत अस्त होते या प्रकारे इतर कलांचा उदयास्त होतो आणि पौर्णिमेची पूर्ण कलेचा अमावास्येत अस्त होतो. अमावास्येला पौर्णिमेच्या कलेचा अस्त झाल्यावर जी चंद्रकला उरते ती १६ वी नित्या कला होय. कारण चंद्राचे हे वास्तविक बिंब प्रत्येक कलेमध्ये सूर्य प्रकाशामुळे कमी जास्त होऊन कलेच्या रूपाने चमकत असतात.
शुद्ध चिती शक्तिच्या १५ कला पंचदशीच्या १५ कलांशी निगडीत आहेत , बद्ध आहेत. १६ वी कला शुद्ध चिती शक्ति चिन्मात्र निर्विकल्प समाधित विराजमान असलेली स्वत: महात्रिपुर सुंदरी होय कारण बाकी सगळ्या कलात घट अथवा वृद्धी होत असते चंद्र बिंब मात्र सदैव एकसारखे असते. म्हणून प्रत्येक कलेला १६ व्या कलेचे अंग / भाग समजला पाहिजे आणि प्रत्येक कलेची पूजा आणि ध्यान संबंधित तिथीला १६ व्या कलेसहित केले जाते.
कुंडलिनीचे सहस्त्रार चक्राकडे उत्थान होत असताना मानस चक्रात असलेल्या चंद्रमंडळाला ती छिद्र पाडते आणि त्या चंद्रामंडलातून अमृत हे आज्ञा चक्रावर टपकू लागते त्यामुळे तिथे चंद्राच्या सगळ्या कला नित्य (सतत ) चमकू लागतात आणि त्या कलांना नित्या असे म्हणतात. या कला मग विशुद्ध चक्रात उतरतात आणि त्याच्या १६ पाकळ्या प्रकाशमान होतात. सहस्त्राराच्या मध्ये असलेल्या चंद्र मंडळाला बैंदव स्थान म्हणतात ते शुद्ध चिती शक्तिची आनंदमयी कलेचे स्थान आहे आणि ह्यालाच श्री अथवा महात्रिपुर सुंदरी म्हणतात.
(पहा सौंदर्य लहरी हिंदी अनुवाद दुसरी आवृत्ती पृष्ट १८६ ते १८८.)
सूर्याचा प्रकाश चंद्रावरून परावर्तीत होऊन त्याला प्रकाशमान करतो म्हणजे चंद्राचा प्रकाश (ज्योत्स्ना = चमकदारपणा) हा सूर्याचाच परावर्तीत प्रकाश आहे अमावास्येला सूर्य आणि चंद्र एका राशीत आल्याने सूर्याचा चंद्रामुळे परावर्तीत होणारा प्रकाश पृथ्वीवर येत नाही म्हणजे सूर्याच्या प्रकाशातील उष्णता चंद्र हरण करतो. उष्णता ही अधिक मात्रेत विषाप्रमाणे असते. विषरूपी उष्णता हरण करून चंद्रातून अमृत स्त्रवू लागते परंतु ही क्रिया अमावस्येला होत नसल्याने समयाचार मार्गीय अमावास्येला पूजा करीत नाहीत. सूर्य आणि चंद्र मूलाधारात एकत्र आल्यावर अमावस्या होते आणि चवथ्या श्लोकात सांगितल्यानुसार, अमावस्येला पूजा निषेध म्हणजेच समयाचार मार्गीय साधकांना मूलाधारात पूजा त्याज्य आहे हे मूलाधार अमावास्येमुळे अंध:कारमय आहे.

**[३४]**

**महाव्योमस्थेन्दोरमृतलहरीप्लाविततनुः**
***प्रशुषद्वै नाडीप्रकरमनिशं प्लावयति तत् ।** पाठभेद - प्रशुष्यद्वेशन्त
**यदाज्ञायां विद्युन्नियुतनियुताभाक्षरमयी**
***स्थिता विद्युल्लेखा भगवति विधिग्रन्थिमभिनत् ॥ ३४॥** पाठभेद - सिता

**सरळ अर्थ :-** महाकाशात असलेल्या चंद्र आपल्या अमृताने शरीराला भिजवून टाकत असतो आणि शरीरातील नाडीसमूहामुळे हे अमृत सुकून जाते आणि हा क्रम सतत चालू असतो. जर योग्याने आज्ञाचक्रामध्ये वीजेने युक्त अशी जी आभा आहे तिला स्थिर करून आणि अक्षरांनी युक्त केली ( अक्षर म्हणजे ब्रह्म युक्त ) असता म्हणजे नष्ट होऊ न दिली असता ती भगवती विद्युतलेखा रूप होते आणि तेव्हा विधी (ब्रह्म) ग्रंथीचा वेध होतो.
**व्याख्या:-** चौथ्या श्लोकात कथन केल्याप्रमाणे शरीरामध्ये अमृत चंद्रनाडी द्वारा वितरित होते आणि भ्रमण करणारा सूर्य त्याचे हरण करतो आणि हा क्रम चालू रहातो.रोजच्या धकाधकीत माणसाच्या शक्तीचा ह्रास होतो आणि रात्री विश्रांति झाल्यानंतर माणूस जीवनशक्ती परत मिळवितो. दिवसा सूर्य विषाचे आणि रात्री चंद्र अमृताचे कार्य करतात. मानवाने आपली शक्ति व्यर्थ ह्रास होऊ दिली नाही तर किंवा हा शक्तीचा ह्रास तो रोखू शकला तर विषाचे स्त्रवण कमी झाल्याने आणि चंद्राच्या अमृताचे स्त्रवण चालू राहिल्याने अमृत जास्त होऊन जीवन शक्तित वृद्धी होते. योगी जेव्हा इडा आणि पिंगला नाड्यांमध्ये प्राणाचा प्रवाह रोखतो तेव्हा हा क्रम बंद होतो आणि प्राण सुषुम्ना नाडीत प्रवेश करतो यावेळी कुंडलिनी शक्ति विजेप्रमाणे लखलखते आणि मणीपुर चक्रात विद्युत लेखेप्रमाणे प्रगट होते ( १४ व्या श्लोकाची व्याख्या पहा ) , जेव्हा ती आज्ञाचक्रात येऊन अक्षर ब्रहमात लीन होते तेव्हा ब्रह्म ग्रंथीचा वेध होतो, किंवा मंत्राची सर्व अक्षरे अंतिम अक्षरात म्हणजेच १६ व्या नित्या मध्ये लय होतो, आता नाश किंवा क्षरण होणे थांबते आणि विष्णु ग्रंथीचा वेध होतो. मंत्राच्या पहिल्या अक्षराला अध:सहस्त्रारातून उचलून त्याचा विषुस्थाना लय केला जातो, दुसऱ्या अक्षराला विषुस्थानातून उचलून त्याचा मूलाधारात , तिसऱ्या अक्षराला मूलाधारातून उचलून स्वाधिष्ठानात , चौथ्या अक्षराला स्वाधिष्ठानातून उचलून मणीपुरात , पाचव्या अक्षराला मणीपुरातुन उचलून अनाहतात , सहाव्या अक्षराला अनाहतातून उचलून विशुद्धात , सातव्या अक्षराला विशुद्धातून उचलून लंबीकात, आठव्या अक्षराला लंबीकातून आज्ञाचक्रात , नवव्याला आज्ञाचक्रातून बिंदुमधे , दहाव्याला बिंदुमधून अर्धचंद्रिकेत , अकराव्याला अर्धचंद्रिकेतून निरोधिकामधे , बाराव्याला निरोधीकेतून नादात , तेराव्याला नादातून नादांतामधे , चौदाव्या अक्षराला नादांतामधून उचलून शक्तिमधे , पंधराव्या अक्षराला शक्तिमधून उचलून व्यापीकेमध्ये. अश्या रीतीने प्रत्येक अक्षर त्याच्या पुढच्या अक्षरात लीन करून संपूर्ण मंत्र पराकला स्वरूपा श्रीकला उन्मनीमध्ये लीन केली जाते तेव्हा सगळ्या ग्रंथिंचा वेध होतो.

**[३५]**

**ततो गत्वा ज्योत्स्नामयसमयलोकं *समयिनां** पाठभेद - ससमया
**पराख्या सादाख्या जयति शिवतत्त्वेन मिलिता ।**
**सहस्त्रारे पद्मे शिशिरमहसां बिम्बमपरं**
**तदेव श्रीचक्रं सरघमिति तद्बैन्दवमिति ॥ ३५॥**

**सरळ अर्थ :-** समयाचार मार्गीयांच्या मतानुसार कुंडलिनी अत्यंत प्रकाशमान अश्या समय लोक किंवा सहस्त्रारात जाऊन परा नामक शिव तत्वाशी एक होऊन सादाख्या तत्वाला जिंकून घेते.सहस्त्रार पद्मात चंद्राचे दुसरे बिंब आहे तेच सरघा आणि तेच बैंदव स्थान आहे.

**व्याख्या:-** कुंडलिनी शक्ति वर जात असतांना क्रमश: सगळ्या तत्वांचा एकमेकात लय होतो हा लय क्रम आहे. या क्रमात सहस्त्रार चक्रात जात असतांना भगवती महाशक्ति सादाख्य म्हणजे सदाशिव , अर्धनारीश्वर तत्व जिंकून शिव तत्वात लीन होते आणि मग परा संवित रूप धारण करते, ही निर्विकल्प समाधीची अवस्था होय. समयाचार मतानुसार सहस्त्रार हे भगवतीच्या पराशक्तीचे स्थान आहे मूलाधार नाही आणि कौल मार्गीय मूलाधारालाच पराशक्तिचे स्थान मानतात. म्हणून आचार्य सांगत आहेत की सहस्त्रार हेच श्रीचक्र आहे अमृताचे स्थान (सरघा) आहे आणि तेच बैंदव स्थान आहे येथेच भगवती परासंवित रूपाने सहस्त्रार चक्रात वास करते आणि म्हणून येथेच तिची पूजा होते.

**[३६]**

**वदन्त्येके सन्तः परशिवपदे तत्त्वमिलिते**
**ततस्त्वं *षट्त्रिंशी भवसि शिवयोर्मेलनवपुः ।** पाठभेद - षट्त्रिंशा
**त्रिखण्डेऽस्मिन्स्वान्ते परमपदपर्यङ्कसदने**
**परे सादाख्येऽस्मिन्निवसति *चतुर्धैक्यकलनात् ॥ ३६॥** पाठभेद - चतुर्थैक्य

**सरळ अर्थ :-** एका विशिष्ट मताचे संत म्हणतात की परमशिवपद तत्वात लय होऊन तू २६ (३६) प्रकारची शिव शक्तिमय शरीराची होऊन जातेस आणि आपल्या तीन खंडाच्या आत परमपदरूपी पलंगावर सादाख्यतत्वाच्या पलीकडे चार प्रकारच्या ऐक्यात रहातेस.
**व्याख्या:-** परम तत्वच अनेक रूप धारण करून सृष्टीचे सृजन करते. श्रुति सांगते की
**" एकोहं बहूस्याम: "** म्हणजे हे परमतत्व सगळ्या तत्वांचे कारण आहे. महा राजराजेश्वरी भगवती त्रिपुरसुंदरी विभिन्न रूपाने सगळ्या तत्वांचे सृजन करते. दृश्य अथवा ब्रह्मांडात जे काही आहे ते सगळे राजराजेश्वरी भगवती त्रिपुरसुंदरी चे स्वरूप आहे म्हणून आचार्यश्री म्हणतात की भगवतीचे परासंवित रूप हेच सगळ्या तत्वांचे जनक आहे. हेच शाक्त किंवा शैवांचे ३६ आणि सांख्यांच्या २६ तत्वांचे रूप धरण करते. त्याच परासंवितात सगळ्या तत्वांचा उदय आणि लय होतो. ५ व्या श्लोकात हे स्पष्ट केलेले आहे.
आधी स्पष्ट केल्यानुसार भगवती त्रिखंडात्मक आहे. श्रीयंत्र , मंत्र , आणि शरीरस्थ चक्र सगळे त्रिखंडात्मक आहे.या सगळ्याच्या शेवटी जे परासंवित , जे चंद्रकला अथवा १६ वे अक्षर आहे ते भगवतीचे वास्तविक स्वरूप आहे आणि या परासंवित रूपात श्री राजराजेश्वरी आपल्या सहस्त्रार रूपी गृहात परमपद रुपी पलंगावर सादाख्य तत्वात चार प्रकारच्या ऐक्यात रहाते, म्हणजे या ठिकाणी शक्ति आणि परम शिवाचे नाम , रूप . अवस्था आणि अनुष्ठान असे साम्य असते. अर्थातच दोन्ही तत्वांचे एकच नाम , रूप , अवस्था आणि कार्य असते.
जरी हे साम्य पांच प्रकारचे आहे उदा. नाम , रूप . अवस्था अनुष्ठान आणि अनुष्ठान साम्य तरी आचार्यश्री इथे केवळ चार प्रकारचे साम्य सांगत आहेत. अनुष्ठान साम्याचा उल्लेख करण्याची गरज नाही कारण शिव आणि शक्ति दोघांचे ऐक्य झाल्यावर ते एकच स्थानी निवास करतात (परमपदपर्यंक सदने) म्हणून आचार्यश्री फक्त चार प्रकारचे साम्य दाखवतात. १३ व्या श्लोकाची व्याख्या पहावी.

***क्षितौ वह्निर्वह्नौ वसुदलजले दिङ्मरुति दि-** पाठभेद - महावह्नि
***क्कलाश्रे मन्वश्रं दृशि *वसुरथो राजकमले ।** पाठभेद - क्कलारे, वसुरधो
***प्रतिद्वैतग्रन्थिस्तदुपरि चतुर्द्वारसहितं ।** पाठभेद - प्रतिद्वैतद्ग्रन्थि
***महीचक्रं चैकं भवति भगकोणैक्यकलनात् ॥ ३७॥** पाठभेद - महाचक्रं

**इति मन्त्रचक्रैक्यम्॥**

**सरळ अर्थ :-** पृथ्वी अग्निमद्धे , अग्नी वसुदलात , जल दिशांमद्धे , वायु दिशेत , कलाश्र मनवश्रात , दृशी वसुरथात आणि राजकमलात , या सगळ्याच्या वर प्रतिद्वैत ग्रंथी चतुरद्वार सहित महीचक्रात , हे भगवती हे भग-कोणांचे ऐक्य झाले.

**व्याख्या:- १ – पृथ्वी अग्निमध्ये** – पृथ्वी म्हणजे पृथ्वी तत्व आणि पृथ्वी तत्व मूलाधारात आहे. म्हणजे या ठिकाणी पृथ्वी म्हणजे मूलाधार आहे. अग्नी चा या ठिकाणी त्रिकोण असा अर्थ आहे कारण अग्निचे स्थान त्रिकोण आहे अथवा अग्नि त्रिकोण स्वरूप आहे. त्रिकोण याचा अर्थ या ठिकाणी श्रीचक्रांतर्गत त्रिकोण आहे. आचार्य येथे मूलाधार आणि त्रिकोण यांचे ऐक्य दाखवीत आहेत किंवा आपण असे म्हणू शकतो की मूलाधार म्हणजे त्रिकोण होय.

२ – **अग्नि वसुदलात** ---अग्नि शब्दाने येथे अग्नि तत्वाचा संकेत आहे आणि अग्नि तत्वाचे स्थान स्वाधिष्ठान आहे. आधी सांगितल्याप्रमाणे पूज्य भगवतपाद शंकराचार्य यांनी सौंदयलहरी मध्ये स्वाधिष्ठानाला अग्निचे स्थान मानले आहे.

**महीं मूलाधारे कमपि मणिपूरे हुतवहं**
**स्थितं स्वधिष्टाने हृदि मरुत-माकाश-मुपरि ।**
**मनोपि भ्रूमध्ये सकलमपि भित्वा कुलपथं**
**सहस्रारे पद्मे सहरहसि पत्या विहरसे ॥ ९ ॥**

**तव स्वाधिष्ठाने हुतवह-मधिष्ठाय निरतं**
**तमीडे संवर्तं जननि महतीं तां च समयाम् ।**
**यदालोके लोकान् दहति महसि क्रोध-कलिते**
**दयार्द्रा या दृष्टिः शिशिर-मुपचारं रचयति ॥ ३९ ॥**

स्वाधिष्ठान चक्र अग्नि तत्वाचे स्थान असल्याने या ठिकाणी अग्नि याचा अर्थ स्वाधिष्ठान चक्र आहे. योगाच्या दुसऱ्या ग्रंथांमधून स्वाधिष्ठानाला जल तत्वाचे स्थान मानले आहे. या ग्रंथांमधून चक्र आणि त्यांची तत्वे खाली दिल्याप्रमाणे आहेत.

१ – मूलाधार - पृथ्वी
२ – स्वाधिष्ठान – जल
३ – मणीपुर - अग्नि
४ – अनाहत/ हृदय – वायु
५ – विशुद्ध - आकाश
६ – आज्ञा - मन

परंतु आचार्यांच्या मतानुसार स्वाधिष्ठान चक्र अग्नि तत्वाचे स्थान आणि मणीपुर चक्र जलाचे स्थान आहे यामुळे पूज्य भगवतपाद शंकराचार्य यांनी सौंदयलहरी मधे असेच मानले आहे. पूज्य भगवतपाद शंकराचार्य सौंदयलहरी मध्ये श्लोक ३६ ते ४१ पर्यंत चक्राचे वर्णन करतांना वरुन खाली असा क्रम येणेप्रमाणे दिला आहे.
१ – आज्ञा २ – विशुद्ध ३ – अनाहत / हृदय ४ – स्वाधिष्ठान ५ - मणीपुर ६ – मूलाधार.
अग्निचे स्थान असल्याने इथे स्वाधिष्ठान हे मणीपुराच्या आधी घेतले आहे.
स्वाधिष्ठानाला अग्निचे स्थान यासाठी म्हटले आहे की कुंडलिनी शक्ति जागृत झाल्यानंतर या चक्रात रहाते. आचार्यांचे हे मत संहिता आणि प्राचीन योग ग्रंथांवर आधारीत आहे. वामकेश्वर तंत्रात स्वाधीष्ठानाला अग्निचे स्थान मानले आहे.

**पद्मासन गतः स्वस्थो गुदमाकुंचय साधकाः |**
**वायुमुर्ध्वगतिम् कुर्वन् कुम्भकाविष्टमानसः ||**
**वाय्वाघातवशादग्निः स्वाधिष्ठानगतो ज्वलन् |**
**ज्वलनाघातपवनाघातैरुन्निद्रितोहिराट् ||**

बहुतेक, स्वाधिष्ठानात असलेल्या जलामध्ये अग्नि असल्याने त्याला अग्निचे स्थान मानले असावे पाण्यात अग्नि आहे हे आजच्या भौतिक शास्त्रानुसार योग्य आहे. पाण्याला जेव्हा बर्फ बनवले जाते तेव्हा त्यातील उष्णता गुप्त उष्मा अथवा लॅटेन्ट हीट म्हटली जाते (समुद्राखाली असलेल्या अग्निला " वडवानल " म्हटले जाते.) हाच जल स्थित अग्नि मणीपुरात विद्युत रूपाने असतो. स्वाधिष्ठान स्थित जल मणीपुरात मेघांच्या स्वरुपात रहाते. मणीपुर मेघांचे स्थान असल्याने जलाचे स्थानही मानले जाते कारण मेघांच्या द्वारे जल , वर्षा रूपाने उत्पन्न होते.
२) **वसुदल** – वसू हा शब्द आठ या संख्येचा सूचक आहे (अष्टवसू) म्हणून याचा अर्थ श्रीचक्रांतर्गत अष्टार आहे. या ठिकाणी आचार्य वन्ही वसुदल म्हणजे स्वधिष्ठान चक्र हे अष्टार आहे असे सांगत आहेत.
३) **जल दिशांमध्ये** – जलाचे स्थान मणीपुरात आहे म्हणून आचार्यश्री यांचा अर्थ मणीपुर चक्र असा आहे. दिशा या दहा असल्याने दहा ही संख्या आहे आणि या संख्येचा आचार्यश्री यांचा अर्थ चक्रांतर्गत अंतर्दशार म्हणजे मणीपुर हे अंतर्दशार आहे.
४) **वायु दिशेत** – वायुचा अर्थ वायूचे स्थान म्हणजे अनाहत / हृदय चक्र आहे , आणि दिशा या दहा असल्याने इथे श्री चक्रांतर्गत बहिर्दशार म्हणून वायु दिशेत याचा अर्थ हृदय चक्र हे बहिर्दशार आहे.
५) **कलाश्रे मन्वश्रं** = कलाश्र मन्वश्रात – कला १६ आहेत म्हणजे १६ ही संख्या धरली पाहिजे , कलाश्र याचा अर्थ १६ पाकळ्यांचे विशुद्ध चक्र होते आणि मन्वश्र याचा अर्थ श्रीचक्रांतर्गत चतुर्दशार होतो कारण मनुंची संख्या ही १४ आहे म्हजे या ठिकाणी आचार्यश्री सांगत आहेत की विशुद्ध चक्र हे चतुर्दशार आहे.
६) **दृशिं वसुरथो राजकमले** – दृशि - वसुरथ आणि राजकमले – दृशि च अर्थ नेत्र असा आहे आणि नेत्र २ असतात म्हणजे आचार्यश्री यांचा अभिप्राय द्विदल पद्म अर्थात आज्ञा चक्र असा आहे. आज्ञाचक्राचे स्थान भृमद्धे असल्याने दृशि चा अर्थ आज्ञा चक्र असा होतो. वसू आठ आहेत (अष्ट वसू) अश्याप्रकारे आचार्यश्री येथे श्रीचक्रांतर्गत अष्टदल पद्माकडे संकेत करतात. राजकमल याचा अर्थ १६ असा आहे कारण नृपती किंवा राजा १६ संख्येचे द्योतक आहे. वरिवस्या रहस्य या ग्रंथात श्री भास्कर राय यांनी नृपती या शब्दाचा १६ या अर्थानी प्रयोग केला आहे. अश्या प्रकारे आचार्यश्री यांचा अर्थ आज्ञा चक्रच श्रीचक्रांतर्गत अष्टदल आणि षोडशदल पद्म आहे.
७) **प्रतिद्वैत ग्रन्थिस्तदुपरि चतुर्द्वार सहितं मही चक्रं चैकं भवति भगकोणैक्य कलनात** - या सगळ्याच्या वर प्रतिद्वैत ग्रंथी चतुरद्वार सहित मही चक्रात हे भगवती हे भग-कोणांचे ऐक्य झाले. प्रतिद्वैत ग्रंथी अद्वैताचे स्थान म्हणजेच सहस्त्रार आणि चतुद्वार सहित महि चक्र याचा अर्थ श्रीचक्रांतर्गत भु-पुर होतो. भग या शब्दाचा अर्थ सहा ही संख्या होते म्हणून भग कोण म्हणजे षटचक्र होतो. म्हणजे आचार्यश्री इथे असे सांगत आहेत की सहस्त्रार हे भुपूर आहे. अश्या प्रकारे षटचक्र आणि श्रीचक्र याचे

ऐक्य पूर्ण झाले. या आधी सांगितले आहे की मंत्र हे यंत्र आहे म्हणून मंत्र = यंत्र = षटचक्र. या श्लोकात आचार्यश्री यांनी सांकेतिक शब्दात षटचक्र आणि श्रीचक्र यांचे ऐक्य दाखविले आहे आणि व्यंजना – शक्तीचा प्रयोग केला आहे.

या ठिकाणी मंत्र आणि चक्र यांचे ऐक्य हा भाग समाप्त झाला.

**[३८]**

*षडब्जारण्ये त्वां समयिन इमे पञ्चकसमां | पाठभेद - षडब्जारण्यैस्त्वां
यदा संविद्रूपां विदधति च षोढैक्यकलिताम्* । पाठभेद - कलितम्
मनो जित्वा *चाज्ञासरसिज इह पादुरभव- | पाठभेद - सरसिजमिह
त्तडिल्लेखा नित्या भगवति तवाधारसदनात् ॥ ३८॥

**सरळ अर्थ :-** हे भगवती , समयाचार मार्गीय , मनाला आज्ञाचक्रात जिंकून तुला षटकमल रूपी अरण्यात पांच प्रकारच्या साम्याने आणि सहा प्रकारच्या ऐक्याने चेतन रूपात किंवा चिती शक्तिच्या रूपात अथवा ज्ञानमयी, विदुल्लेखा प्रमाणे प्रकाश असलेली मूलाधारात उत्पन्न झालेली नित्या स्वरूप मानतात.

**व्याख्या:-** समयाचार मार्गानुसार कुंडलिनी शक्ति ही राजराजेश्वरी भगवती आहे. योगी जेव्हा मनाला जिंकून
(मन तत्वाला) भगवती कुंडलिनी शक्ति जागृत करून घेतात तेव्हा ती विद्युल्लेखेप्रमाणे प्रकाशमान होऊन मूलाधारातून वर जाता जाता सगळ्या चक्रांचा वेध करते. २ ऱ्या आणि ३ ऱ्या श्लोकात कुंडलिनी शक्तीच्या जागरणाविषयी सांगितले गेले आहे.
पांच प्रकारचे साम्य – कुंडलिनी शक्तिच्या जागृतिनंतर प्रत्येक चक्रात भगवती आणि भगवान शंकर यांचे पांच प्रकारचे साम्य होते. हे शिव आणि शक्ति यांचे साम्य खाली दिल्याप्रमाणे आहे.

१) अधिष्ठान साम्य = दोघांचा एका स्थानात निवास
२) अंनुष्ठान साम्य = दोघांचे एकाच प्रकारचे कार्य (मूलाधारात दोघेही नृत्य करतात) सौ. ल. श्लोक ४१
३) अवस्थान साम्य = दोघांची एकच अवस्था असणे.
४) रूप साम्य = दोघांचे एकसमान रूप असणे
५) नाम साम्य = एकसारखे नाव असणे (जसे व्योमेश्वर आणि व्योमेश्वरी)

**[३९]**

**भवत्साम्यं केचित्त्रितयमिति *कौलप्रभृतयः |** पाठभेद - कौम्भप्र
**परं तत्त्वाख्यं *चेत्यपरमिदमाहुः समयिनः ।** पाठभेद - चेत्स पर इद, परमिद
**क्रियावस्थारूपं प्रकृतिरभिधापञ्चकसमं ~**
**तदेषां साम्यं *स्यादवनिषु च यो वेत्ति स मुनिः ॥ ३९॥** पाठभेद - त्वामवनिषु

**सरळ अर्थ :-** काही कौल मतानुयायी तीन प्रकारचे साम्य मानतात अर्थात कौल मतावलंबी तीन प्रकारचे साम्य मानतात (आचार्यांच्या अनुसार हे त्याज्य आहे) परंतु समयाचार मार्गीयांच्या अनुसार एक

तुझे परम तत्व नावाचे आहे आणि तुझे परम तत्व रूप या सगळ्यांच्या पेक्षा वेगळे आहे आणि जो परम तत्वाने क्रिया , अवस्था , रूप , प्रकृती आणि नाम असे पांच प्रकारचे साम्य जाणतो तो या पृथ्वीवर मुनीच होय.

कठीण शब्दांचा अर्थ — **चेत्यपरमिदमाहुः -- च+इति+अपर+इदं+आहुः |**

**प्रकृतिरभिधा – प्रकृतीः + इभिधा ( इभिदा = नाम )**

**व्याख्याः-** कौल मार्गाला मानणाऱ्याच्यानुसार मूलाधारात उपासना होते. त्यांच्या मतानुसार मूलाधाराचा त्रिकोण हा श्रीचक्रांतर्गत त्रिकोण आहे आणि या त्रिकोणामध्ये बिंदुस्थान आहे जे भगवतीचे स्थान आहे. त्रिकोण हे योनिस्थान आहे म्हणून प्रत्यक्ष योनीलाच भगवतीचे स्थान मानून तिची पूजा होते, परंतु समयाचार मतानुसार भगवती कुंडलिनीचे स्थान सहस्त्रार आहे आणि जागृत झाल्यानंतर परासंवित रूपात परम शिवासोबत पांच प्रकारच्या साम्य म्हणजे क्रिया,अवस्था,रूप,[रकरूती आणि नाम या सह रहाते. जो या साम्याला जाणतो म्हणजे ज्याने कुंडलिनी शक्ति जागवून परम शिवमध्ये लीन केली आहे किंवा अश्या प्रकारे निर्विकल्प समाधी अवस्था प्राप्त केली आहे तो या पृथ्वीवर मुनि समाजाला जातो. या ठिकाणी आचार्यश्री कौल मार्ग आणि समयाचारी मार्ग यांच्यातील फरक सांगितला आहे. कौल उपासक भगवती कुंडलिनी शक्ति ची मूलाधारात उपासन करतात पण समय मार्गी साधक कुंडलिनी जागवून तिची सहस्त्रारात पूजा करतात.

अश्या प्रकारे भगवती कुंडलिनी शक्ति चा परम शिवाशी होणारे ऐक्य सांगून झाले.

आता पुढील दोन ४० आणि ४१ व्या श्लोकात आचार्यश्री शरीरातील श्रीचक्राच्या तीन प्रकारच्या प्रस्तारचा भेद निरूपण करीत आहेत. श्रीचक्र प्रस्तार भेद तीन प्रकारचे आहेत.

१) मेरू प्रस्तार २) कैलास प्रस्तार ३) भु प्रस्तार  अधिक महितीसाठी सौन्दर्य लहरीच्या ३१ व्या श्लोकाची श्री लक्ष्मीधर यांची टीका पहावी.

**[४०]**

**वशिन्याद्या अष्टावकचटतपाद्याः प्रकृतयः ,**
**स्ववर्गस्थाः स्वस्वायुधकलितहस्ताः स्वविषयाः ।**
***यथावर्गं वर्णप्रचुरतनवो याभिरभवं-**   पाठभेद - यदा वर्गा वर्णप्रचुरतरवो
**स्तव प्रस्तारास्ते त्रय इति जगुस्ते समयिनः ॥ ४०॥**

**सरळ अर्थ :-** अ क च ट त प (य,श) आदी आठ प्रकृती , वशिनी आदी आठ देवता आपआपल्या वर्गात स्थित असतात आपआपल्या हातातील आयुधांनी शोभायमान आणि आपआपल्या विषय असलीलया जसे वर्ग, सारी वर्णमालेत ज्या प्रकारे प्रगट होतात तो तुझा तीन प्रकारचा प्रस्तार आहे असे समयाचार मार्गीय म्हणतात.

**व्याख्याः-** वशिनी आदी आठ वाणीच्या देवी आहेत , त्यांची नावे १) वशिनी २) कामेश्वरी ३) मोदनी  ४) विमला ५) अरुणा ६ ) जयनी ७) सर्वेश्वरी अथवा सरवेशी आणि ८) कौलिनी.

वर्णमालेचे ८ वर्ग आहेत १) अ वर्ग २) क वर्ग ३) च वर्ग ४) ट वर्ग ५) त वर्ग ६) प वर्ग ७) य वर्ग ८) श वर्ग

वशिनी आदी आठ देविंचा वर्णमालेच्या प्रत्येक वर्गाशी संबध असा आहे

वशिनी –   अ वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.
कामेश्वरी - क वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.
मोदनी –  च वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.
विमला  –  ट वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.
अरुणा  –  त वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.

जयनी –   प वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.
सर्वेशी –   य वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.
कौलिनी – श वर्गाची अधिष्टात्री देवी आहे.

**[४१]**

**इमा नित्या वर्णास्तव चरणसंमेलनवशा-**
**न्महामेरुस्थाः *स्युर्मनुमिलनकैलासवपुषः ।**   पाठभेद - **स्थास्यन्मनु**
**वशिन्याद्या एता अपि *तव सबिन्द्वात्मकतया**  पाठभेद - **च सहबि**
**महीप्रस्तारोऽयं क्रम इति रहस्यं समयिनाम् ॥ ४१॥**

**सरळ अर्थ :-** नित्या वर्ण आणि तुझे चरण म्हणजे नाद यांच्या घोळक्यात तू महामेरू मध्ये असतेस आणि मंत्रांबरोबर तू कैलासरूपी शरीराची असतेस. या वाशिनी आदी तुझ्या बिंदु त्मक रूपाने (सहा चक्र रूपी तुझ्या शरीरात मिसळून) महिपरसतर आणि भू प्रस्तार क्रम बनवतात. हे समयाचार मार्गीयांचे रहस्य आहे.

**व्याख्या:-** 1) नित्या , वर्णमाला , आणि नाद यांचे ऐक्य हा मेरू प्रस्तार आहे.
२) नित्या , वर्णमाला आणि मंत्र यांचे ऐक्य हा कैलास प्रसत्र आहे.
३) वशिनी आदी वाणीच्या देवता आणि षटचक्र यांचे ऐक्य हा भू –प्रस्तार आहे.
अश्या तऱ्हेने श्रीचक्राच्या तीन प्रस्ताराचे निरूपण आहे. या विषयी अधिक महितीसाठी सौंदर्यलहरी च्या ३१ व्या श्लोकावरील श्री लक्ष्मीधर यांची टीका पहावी.
आता पुढील दोन श्लोकांमध्ये आचार्यश्री कौल मताचे खंडण करून समयाचार मार्गाची श्रेष्ठता प्रतिपादन करीत आहेत.

**[४२]**

**भवेन्मूलाधारं तदुपरितनं चक्रमपि त-**
**द्द्वयं तामिस्राख्यं शिखिकिरणसंमेलनवशात् ।**
**तदेतत्कौलानां प्रतिदिनमनुष्ठेयमुदितं**
**भवत्या वामाख्यं मतमपि परित्याज्यमुभयम् ॥ ४२॥**

**सरळ अर्थ :-** मूलाधार आणि त्याच्यावरचे चक्र ही दोन्ही अग्निच्या किरणांशी जोडलेले असल्याने तामिस्त्र संज्ञक आहेत आणि अंधकारमय आहेत.कौलामतानुयायी दररोज यातच अनुष्ठान करून समाधान मानतात. वामाचार मार्गीयांचेही हेच मत आहे . हे दोन्ही त्याग करण्यासारखे आहेत.
**व्याख्या:-** आचार्यश्री या श्लोकात खालची दोन चक्र मूलाधार आणि स्वाधिष्ठान यांना अंधकारमय आहेत असे दाखवितात यांच्या वरची चार चक्रे सूर्य आणि चंद्र द्वारा प्रकाशित आहेत, परंतु खालच्या दोन चक्रात प्रकाश पोहोचत नाही. विशुद्ध आणि आज्ञा चक्र चंद्राच्या किरणांनी प्रकाशित झाले आहेत. अनाहत सूर्यचे स्थान आहे आणि सूर्यकिरणे मणीपुर चक्राला प्रकाशमान करते पण मणीपुरतील मेघांमुळे सूर्यकिरणे खाली पोहोचत नाहीत.
आकाशातील ढगांमुळे सूर्य झाकोळून जातो आणि पृथ्वीवर अंधार होतो तसाच अंधार मणीपुरातील मेघांमुळे खालील दोन चक्रांमद्धे असतो. म्हणून समयाचार मार्गीय योगी या दोन चक्रात उपासना अर्थात कुंडलिनी शक्तिचे ध्यान करीत नाही. या विपरीत कौल आणि वाममार्गी या दोन चक्रात पूजा करतात. समयाचार मार्गीयांसाठी ही दोन चक्रे त्याज्य आहेत.

**अमीषां कौलानां भगवति भवेत्पूजनविधि-**
**स्तव स्वाधिष्ठाने तदनु च भवेन्मूलसदने ।**
**अतो बाह्या पूजा भवति भगरूपेण च ततो**
**निषिद्धाचारोऽयं निगमविरहोऽनिन्द्यचरिते ॥ ४३॥**

**सरळ अर्थ :-** हे भगवती , कौल मार्गी तुझी पूजा स्वाधिष्ठान आणि मूलाधारात करतात म्हणून त्यांची बाह्य पूजा भगादि रूपात होते आणि हा निषिद्ध असा आचार आहे. हे अनिंद्य (परम पवित्र चरित्र असलेली हे शास्त्राच्या विरुद्ध आहे.

**व्याख्याः-** कौल आणि वाम मार्गी लोकांच्या पूजा विधी मधे पंचमकाराचा प्रयोग / वापर होत असतो आणि हे लोक स्त्रीच्या योनीची पूजा करतात. समयाचार मतानुसार हा विधी निषिद्ध आहे आणि निगम शास्त्रानुसार विरुद्ध असल्याने त्याज्य आहे. तंतरही म-पंचकाचा प्रत्यक्ष निषेध आहे आणि यातील गूढ अर्थ स्पष्ट केला आहे

**श्री देव्युवाच –**

**मुद्रा नाम कीं जातं तत्व किन्नामकं भवेत |**
**मकारा: किंस्वरुपाश्च (स्वरुप: स्यु) सर्व कथय शङ्कर ||१६||**

**श्री शिव उवाच**

**रहस्यं कथ्यते देवि श्रुणु यत्नेन साम्प्रतं |**
**महादेव्या (महादेवो) यथा प्रोक्तं तद्रूपं ब्रुयते (क्रियते) यथा ||१७||**
**तद्रुपधारणान्मुद्रा तद्रूपाद्विकृतिर्भवेत |**
**विना मार्ग महेशानि गतिश्चैव कथं भवेत ||१८||**
**मार्ग प्रदर्शनाद्देवि गति: सर्वत्र दृश्यते |**
**तन्मार्ग दर्शनार्थ हि नान्नाथ मकारा पञ्च कीर्तिता ||१९||**
**ज्ञात्वा फ़लमवा(मथा) प्रोति नात्र कार्याविचरणा |**
**बृहियं मण्डलाकारं चन्द्रबिम्बनिभं शुभं |**
**चारु पक्क मनोहारि शर्कराद्यै प्रपुरितं |**
**पूजा काले च देवीनां मुद्रैषा परिकीर्तिता |**
**ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च इश्वरश्च सदाशिवः ||२०||**
**एते पञ्च म (प्र) काराश्च पञ्चनाम प्रका(चा)र का: |**
**आत्म विद्या शिवा सर्वा  पूर्णेति पञ्चम विदुः ||२१||**
**पञ्च तत्वानि देवेशि केरले कीर्तितानि च |**
**पञ्च (एव)  मुद्रानामधरा (धुना) स्त्यान्दो वच्मि संश्रुणु ||२२||**
**ब्राह्मी च वैष्णवी रौद्री ईश्वरि श्री: सदाशिवा |**
**पञ्च्मुद्र समाख्यातास्तत्वना (स्तत्तन्त्रा)म धर शिवे ||२३||**
**संतर्प्य कुन्डलिं शक्ति: पञ्च मुद्रविधानत: |**
**अलिनां पिशितं मिनं मुद्रा मैथुनमुत्तमम ||२४||**

**मकार पञ्चकं यत्र तत्र देवी(वो) न संशयः |**
**न मद्यं माधवी मद्यं मद्यं शक्ति रसोद्भवम ||२५||**
**सुषुम्ना शंखिनी मुद्रा उन्मन्यनुत्तमं रस: (पुन) |**
**साम रस्यामृतोल्लासं मैथुनं च सदाशिवं ||२६||**
**महाकुण्डलिनी शक्तिस्तद्द्योगार्थं महेश्वरि |**
**शक्तिः प्रोक्ता महेशानि न भोगार्थ मयेरिता ||२७||**
**कुण्डली सामरस्यार्थं स्वयम्भुलिङ्गम् मिरितम |**
**एतदभ्यासयोगेन कुण्डली रसवान भवेत ||२८||**

**श्री देव्युवाच –**
**कुण्डली की दृशी देव तद्रस: कीदृशो भवेत् |**
**श्री शिव उवाच –**
**अर्वाच्यं(त्य) (अगम्यं) यद्भ्वेदवच्मि(दुब्रह्म) तद्रसस्तु यथा भवेत ||२९||**
**तथा समरसानन्द् रस; संकिर्तितो मया |**
**अज्ञानादपि देवेशि भोग वासनायापि च ||३०||**

**फ़ल संसारजं देवि गर्भ रूपेण जाग्रति(यते) |**
**ज्ञात्वा (नात्) फ़लमवाप्नोति त्रैलोक्य विजयी भवेत् ||३१||**
**तस्मात्तु पञ्चमी मुद्रा कीर्तिता तु मया तव |**
**संयोगामृतयोगेन कुन्द्ल्युत्थान कारणात् (कारयेत्) ||३२||**
**चा(च)न्द्र पात्रे (पत्रे) यदा याति तन्मदयं परिकिर्तितम् |**
**मणिपूरे दशदले सुषुम्नायां यदा गतिः(गच्छति) ||३३||**
**तत्करामृतयोगाद्वि (संयोग:) द्वितिया प्रकीर्तिता |**
**हृत्पद्मद्वादशारे तु शन्खिनी कुर्म संस्थिता ||३४||**
**सुधासागर क्रीडायां मत्स्यस्तत्र प्रकीर्तिता |**
**मुद्रा तृतीया गदिता चतुर्थी षोडशच्छदे (शे-दले) ||३५||**
**चन्द्र सूर्याग्नि संभिन्ना वर्तुला बिंदुगर्भिता |**
**भग(मग) ध्वाज्याख्यचणकै (वर्णांकै) र्घटिता तु चतुर्थिका ||३६||**
**पञ्च(एव) मुद्रा मया प्रोक्ता मोक्ष(मुख्य) भब् फ़लात्पये |**
**मकार पञ्चकेनैव ज्ञानमेतस्य जायते ||३७||**
**मकार(कारण) रूप मार्गोहि कीर्तितस्ते मया तव |**
**इति संक्षेपत: प्रोक्तं किमन्यच्छरोतूमिच्छसि ||३८||**

------इति श्री शक्तिसंगम महातंत्रराजे उत्तर भागे द्वितीय खंडे (तारा खंडे ) श्रीमदक्षोभ्य महोग्रतारा संवादे मुद्रा संकेतनाम द्वात्रिंशति (पंचं त्रिशतं) पटल: |

**मद्य – व्योम पंकजं निस्यंद सुधापान रतो नर: |**
**मधुपायी सम: प्रोक्तस्त्वितरे मद्यपायिन: || ---- कुलार्णव तंत्र**
**जिव्हया गल संयोगात पिबेत तदमृतं तदा |**
**योगिभी: पीयते तत्तू न मद्यम गौडपैष्टीकम || ---- गंधर्व तंत्र**
**मांस – पुण्यापुण्ये पशु हत्वा ज्ञान-खड्गेन योगवित |**
**परे लयं नयेच्चित्तं मांसाशी स निगद्यते || ---- कुलार्णव तंत्र**
**मत्स्य – गंगायमुनयोर्मद्धे द्व्वौ मत्स्यौ चरत: सदा |**
**तौ मत्सौ भक्षयेत यस्तु स भवेन्मत्स्य साधकः ||**

**मुद्रा – सत्संगेन भवेन्मुक्तिरसत्सङ्गेषु बन्धनं |**
**असत्संगमुद्रणम यत्तु तन्मुद्रा परिकीर्तिता ||**
**मैथुन – इडा पिङ्गलयो: प्राणान सुषुम्नायां प्रवर्तयेत |**
**सुषुम्ना शक्ति रुद्दिष्टा जिवोयं तु पर: शिव: |**
**तयोस्तु संगमे देवै: सुरतं नाम कीर्तितं ||**

**[४४]**

**नवव्यूहं कौलप्रभृतिकमतं* तेन स विभु-** पाठभेद - प्रभृतिकमिदं
**र्नवात्मा देवोऽयं जगदुदकृद्भैरववपुः* ।** पाठभेद - कृच्छैशंववपुः
**नवात्मा वामादिप्रभृतिभिरिदं *भैरववपु-** पाठभेद - बैंदववपुः
**र्महादेवी ताभ्यां जनकजननीमज्जगदिदम् ॥ ४४॥**

**सरळ अर्थ :-** कौल आदी मतानुसार नऊ व्यूह आहेत त्या द्वारा तो विभू नवात्मा देह (नवात्मा भगवान शंकराचे नाव आहे) भैरव रूपाने जगाचा उदय अर्थात संसाराची रचना करतो. तो भैरव शरीराचा नवात्मा वामादि देवींच्या बरोबर त्यांच्यासाठी आहे , हे महादेवी ! जनक जननी प्रमाणे आहे.
**व्याख्या:-** नवात्मा म्हणजे भगवान शंकर आहे आणि त्याचे नऊ व्यूह याप्रमाणे आहेत—
काल , कुल , नाम , ज्ञान , चित्त , नाद , बिंदु , कला , आणि जीव. ( सूर्य आणि चंद्र काळाच्या अंतर्गत आहेत.)
वामादी नऊ शक्ति --- वामा , ज्येष्ठा , रौद्री , अंबिका , इच्छा , ज्ञान , क्रिया , शांती आणि परा .
या श्लोकात आचार्यश्री कौल मत सांगत आहेत त्यानुसार परमेश्वर (परम ब्रह्म) नऊ व्यूहात्मक आहे आणि तो वामादी देवींबरोबरनऊ प्रकारच्या ऐक्याने भैरव – भैरवी रूपाने जगाचा कर्ता आणि भर्ता होतो. जसे

**नव व्यूहात्मको देव: परानंद परात्मक: |**
**नवात्मा भैरवी देवो भुक्ति मुक्ति प्रदायक: ||**
**परानंद परा शक्तीश्चिद्रूपानंद भैरवी |**
**तयोर्यदा सामरस्यं जगद्रूत्पद्यते तदा ||**

**[४५]**

**भवेदेतच्चक्रद्वितयमतिदूरं समयिनां**
**विसृज्यैतद्युग्मं तदनु मणिपूराख्यसदने ।**
**त्वया *सृष्टैर्वारिप्रतिफलितसूर्येन्दुकिरणै-** पाठभेद - सृष्टे वारि
***र्द्विधा लोके पूजां विदधति भवत्याः समयिनः** ॥ ४५॥ पाठभेद - र्विभालोके

**सरळ अर्थ:-** समयाचार मार्गीयांसाठी हे दुसरे चक्र (स्वाधिष्ठान) अति दूर आहे कारण या दोघांचे (मूलाधार आणि स्वाधिष्ठान ) विसर्जन करून यांच्या मागे मणीपुर नामक सदनात तुझ्यामुळे उत्पन्न होणाऱ्या जळामुळे प्रतिफलीत झालेले सूर्य आणि चंद्राच्या किरणांच्या द्वारे दोन प्रकारांनी तुझी पूजा समयाचार मार्गीयांनी करावयाची असते.

**व्याख्या:-** या श्लोकात आचार्य स्वाधिष्ठान आणि मूलाधार या मध्ये ध्यान करण्याचा निषेध करीत आहेत आणि मणीपुर चक्रात भगवती कुंडलिनीचे ध्यान करणे समयाचार मार्गीयांसाठी श्रेयस्कर आहे .
मणीपुरत मेघांच्या रूपात असलेल्या जलावर सूर्य आणि चंद्राची किरणे प्रतिबिंबीत होतात यावर दोन प्रकारे ध्यान केले जाऊ शकते. सूर्याच्या किरणांमुळे भगवतीचे स्वरूप इंद्रधनुष्याची आभायुक्त आणि चंद्राच्या किरणांच्या बिंबाने चमकदार होते.
किंवा पाठभेदानुसार मणीपुरात मेघरूपी जलावर प्रतिबिंबीत सूर्य आणि चंद्र किरणांच्या द्वारा भगवतीचे ध्यान प्रकाशाच्या माध्यमातून केले जाऊ शकते.

**[४६]**

**अधिष्ठानाधार द्वितयमिदमेवं*  दशदलं** पाठभेद - मेतद्दश
**सहस्राराज्जातं *मणिपुरमतोऽभूद्दशदलम् ।** पाठभेद - मणिपुरमितो
**हृदम्भोजान्मूलान्नृपदलमभूत्स्वान्तकमलं**
**तदेवैको बिंदुर्भवति जगदुत्पत्तिकृदयम् ॥ ४६॥**

**सरळ अर्थ:-** सहस्त्रारातून उत्पन्न झालेल्या मूलाधार आणि स्वाधिष्ठान यांचे मिळून दहा पाकळ्या (दल) मूलाधाराचे दहा दल होतात हृदय आणि मूलाधाराच्या मिळून सोळा पाकळ्या (दल) होतात आणि इथे एक बिंदु (सहस्त्रारात) होतो ज्यामुळे सगळी उत्पत्ति होत असते किंवा हे जगाच्या उत्पत्तीचे कारण आहे.
**व्याख्या:-** या श्लोकात आचार्य एका परम तत्वापासून जगाची उत्पत्ति सांगत आहेत. हे परमतत्व म्हणजे सहस्त्रारात असलेला बिंदु जो  दशधा (दहा प्रकारचा) होऊन मूलाधार आणि स्वधिष्ठान यांची दहा दले बनवतो. मूलाधार आणि स्वाधिष्ठान यांची दहा दले त्याच एका बिंदु च्या प्रसरणाने होतात जो लय क्रमाने परत सहस्त्रारात एक होऊन जातात. जसे __

**दशधा भिद्यते बिंदु: एक एव परात्मक:|**
**चतुर्धाधार कमले षोढाधिष्ठान पंकजे|**
**उभयाकार रुपत्वात इतरेषाम तदात्मता||**

मूलाधारात बिंदु चार प्रकारचा असतो – मन , बुद्धी , अहंकार आणि चित्त तसेच स्वाधीष्ठानात सहा प्रकारचा
काम , क्रोध , लोभ , मोह , मद आणि मात्सर्यरूप असतो. अशा रीतीने एक परमतत्व दशधा होऊन जगाचे सृजन करते. मणीपुर चक्राच्या दहा दलांमध्ये हा दहा रूपात आहे , म्हणजे मणीपुर चक्रात मूलाधार आणि स्वाधिष्ठान यांचे युग्म रूप आहे. अशाच प्रकारे मणिपूराचे दहा दल आणि आणि स्वाधिष्ठान मिळून अनाहताचे बारा दल होतात. अनाहताचे बारा आणि मूलाधाराचे चार मिळून विशुद्ध चक्राचे सोळा दल होतात . आज्ञा चक्राची दोन दले म्हणजे मूलाधार आणि स्वाधिष्ठान आहेत आणि हेच सहस्त्रारात एक होऊन बिंदुरूप होतात. अशा रीतीने मणीपुर ते आज्ञा पर्यन्त सगळी चक्रे मूलाधार आणि स्वाधिष्ठान रूप आहेत. म्हणून ही चक्रे सोडून, सहस्त्रारात एक बिंदु रूपात भगवतीच्या परासंवित रुपाचे ध्यान केले पाहिजे किंवा हे सगळे त्या परा संविताचेच रूप आहे असे ध्यान केले पाहिजे आणि अशा प्रकारे पिंड , ब्रह्मांड आणि परमात्मा यांच्या ऐक्याचे ध्यान केले पाहिजे.

| उत्पत्ति | लय | |
|---|---|---|
| परमबिंदू | सहस्त्रारस्त | |
| | आज्ञा | मूलाधार + स्वाधिष्ठान |
| | विशुद्ध | अनाहताचे १२ + मूलाधाराचे ४ = १६ दल |
| दशधा | अनाहत | मणीपुराचे १० + मूलाधार + स्वाधिष्ठान = १२ दल |
| | मणीपुर | मूलाधाराचे ४ + स्वाधिष्ठानाचे ६ = १० |
| मूलाधार = ४ | स्वाधिष्ठान = ६ | |

[४७]

**सहस्रारं बिंदुर्भवति च ततो बैंदवगृहं**
**तदेतस्माज्जातं जगदिदमशेषं *सकरणम् ।** पाठभेद - न करणम्
**ततो मूलाधाराद्द्वितयमभवत्तद्दशदलं**
**सहस्राराज्जातं तदिति दशधा बिंदुरभवत् ॥ ४७॥**

**सरळ अर्थ:-** सहस्त्रार बिंदु आहे त्यामुळेच ते बैंदव गृह आहे. या बिंदूमुळे मूलाधार आणि स्वाधिष्ठानाच्या दहा दलांची उत्पत्ति होते सहस्त्रारात उत्पन्न होऊन हा दहा प्रकारचा बिंदु होतो.

**व्याख्या:-** शक्तिचे निर्गुण स्वरूप बिंदुरूप आहे. कुंडलिनी शक्ति सहस्त्रारात परम शिवाशी मिसळून बिंदुरूपा होऊन जाते म्हणजे उन्मनी अवस्थेत ही बिंदुरुपा आहे किंवा कुंडलिनी शक्ति सहस्त्रारात बिंदुरुपाने वास करते म्हणून सहस्त्राराला बैंदव गृह म्हणतात. शक्तिचे हे रूप परम बिंदु अथवा कारण बिंदु समजले जाते. हा बिंदु सकाळ जगाच्या उत्पत्तीचे कारण अहेम्हणून याला कारण बिंदु असे म्हणतात. या अवस्थेत शक्ति आणि शिव एकरूप होऊन रहातातआणि ही अभिन्न अवस्था यांचे पांच प्रकारचे साम्य आहे.
ही अवस्था **चणकवत** म्हणजे चण्या प्रमाणे म्हणता येईल चण्यामधील दोन दले शिव शक्ति सदृश आहेत आणि चणा कारण बिंदु आहे. जेव्हा या बीजापासून वृक्षाची उत्पत्ति होते तेव्हा प्रथम बीज फुटते आणि त्याची दोन दले भिन्न होतात आणि अंकुराचा जन्म होतो. या प्रकारेच जेव्हा निष्क्रिय ब्रह्म सृष्टीच्या सामोरं होते तेव्हा प्रथम अहं चे स्फुरण होते हे त्याचे फुटणे होय आणि हाच कारण बिंदु आहे. मग यातून अहं आणि इदं च उदय होतो जो शिव आणि शक्ति स्वरूप आहे या दोघांच्या मिथुनाच्या नादाने बिंदूची उत्पत्ति होते. शिव-शक्ति ही श्वेत आणि रक्त बिंदु अथवा कार्य बिंदु म्हणजे बीज आहे. सहस्त्रारातून उत्पन्न होऊन हा बिंदु दशधा होऊन (श्लोक ४६ प्रमाणे) मूलाधार आणि स्वाधिष्ठान कमळांची दहा दले बनवितो.

[४८]

**तदेतद्बिन्दोर्यद्दशकमभवत्तत्प्रकृतिकं**
**दशारं सूर्यारं नृपदलमभूत्स्वान्तकमलम्* ।** पाठभेद - न्नेत्रकमलम्
**रहस्यं कौलानां द्वितयमभवन्मूलसदनं**
***तथाधिष्ठानं च प्रकृतिमिह *सेवन्त इह ते ॥ ४८॥** पाठभेद - तदा, मथ सेवन्त्विह च ते

**सरळ अर्थ:-** या दशधा बिंदुपासून मणीपुर , हृदय , विशुद्ध आणि आज्ञाचक्राची दहा , बारा, सोळा आणि दोन दले होतात. कौल मार्गीयांच्या अनुसार मूलाधार आणि स्वाधिष्ठान की कारण स्थाने होत आणि म्हणून ते या दोन चक्रात प्रकृतीरूपा भगवतीची सेवा (उपासना) करतात

**व्याख्या:-** संपूर्ण जगाचा कारण असलेला बिंदु सहस्त्रारातआहे आणि दशधा होऊन सगळ्या चक्रांच्या दलाच्या (पाकळ्यांच्या) रूपात प्रगट होतो.(४६ व्या श्लोकात स्पष्ट केले आहे)
कौल मार्गाचा अवलंबन करणारे असे म्हणतात की मूलाधार हे बिंदु स्थान आहे आणि स्वाधिष्ठानात प्रगट होऊन जगाचे कारण होतो म्हणू हे लोक खालच्या दोन चक्रांमधे भगवतीची उपासना करतात आणि मूलाधारालाच बैंदव गृह मानतात आणि पंचमकार पद्धतीने बाह्य उपासनेत मग्न रहातात.

**[४९]**

**अतस्ते कौलास्ते भगवति दृढप्राकृतजना**
**इति प्राहुः प्राज्ञाः कुलसमयमार्गद्वयविदः ।**
**महान्तः सेवन्ते सकलजननीं बैंदवगृहे**
**शिवाकारां नित्याममृतझरिकामैन्दवकलाम् ॥ ४९॥**

**सरळ अर्थ:-** म्हणून हे भगवती ! हे कौल मार्गीय पक्के सामान्य माणसे आहेत असे कुल मार्ग आणि समयाचार मार्ग दोन्ही जाणणारे विद्वान म्हणतात. महापुरुष , सगळ्या कलांची जननी , शिवाकारा , नित्या , अमृत क्षरण होणाऱ्या चंद्रकलेच्या बैंदव गृहात (सहस्त्रारात) त्याचे सेवन करतात म्हणजेच त्या परासंविताची सहस्त्रारात उपासना करतात.

**व्याख्या:-** कौल मार्गाची उपासना ही बाह्य उपासना आहे. म पंचकाचा प्रत्यक्ष प्रयोग आणि मूलाधार आणि स्वाधिष्ठान पर्यंतच सीमित आहे म्हणूनही त्याज्य आहे आणि कुलाचार आणि समयाचार मार्गाच्या आचार्यांच्या अनुसार या प्रकारचे लोक पक्के सामान्यजन आहेत. ही उपासना खालच्या स्तरावरील उपासकांसाठी आहे. उच्च श्रेणीचे साधक व महापुरुष तर सहस्त्रारात चंद्रकलेच्या रूपात भगवती कुंडलिनी शक्तीची उपासना करतात आणि कुंडलिनीला जागवून सहस्त्रारात घेऊन जातात आणि तिला परमशिवात लीन करून त्या सादाख्य तत्वाची उपासना करतात.

**[५०]**

**इदं *कालोत्पत्तिस्थितिलयकरं पद्मनिकरं** पाठभेद - कौलोत्पत्ति
**त्रिखण्डं श्रीचक्रं मनुरपि *च तेषां च मिलनम् ।** पाठभेद - तु
**तदैक्यं षोढा वा भवति च चतुर्धेति च तथा**
**तयोः साम्यं पञ्चप्रकृतिकमिदं शास्त्रमुदितम् ॥ ५०॥**

**सरळ अर्थ:-** काल , उत्पत्ति , स्थिती , लय या सगळ्यांचं करता, कमळ समूह , त्रिखंडात्मक श्रीचक्र आणि मंत्र व त्यांचे मिलन , सहा अथवा चार प्रकारचे ऐक्य आणि त्यांचे पांच प्रकारचे साम्य हे सर्व शास्त्र सम्मत आहे अथवा हेच शास्त्रांचे मत आहे.
**व्याख्या:-** १) काल उत्पत्ति स्थिती लय यांचा कर्ता – पराशक्ति
२) कमळ समूह – षटचक्र

३) तीन खंडात्मक श्रीचक्र – सोम , सूर्य , अनलात्मक तीन खंडात्मक श्री चक्र
४) मंत्र – श्री विद्येचा मंत्र.
या सहा आणि चार प्रकारचे ऐक्य आणि पांच प्रकारचे साम्य याबद्दल आधी सांगितले गेले आहे.
या पुढील दोन श्लोक फलश्रुतिचे आहेत.

**[५१]**

**उपास्तेरेतस्याः फलमपि च सर्वाधिकमभू-**
**त्तदेतत्कौलानां फलमिह हि चैतत्समयिनाम् ।**
**सहस्रारे पद्मे सुभगसुभगोदेति* सुभगे** पाठभेद - क्तेति सुभगं
**परं सौभाग्यं यत्तदिह तव सायुज्यपदवी ॥ ५१॥**

**सरळ अर्थ:-** अश्या प्रकारे समय मार्गाच्या उपासनेचे फळ सर्वाधिक आहे. कौल मार्गाची उपासनेचे जे फळ आहे तेसुद्धा समयाचार मार्गीयांना मिळत असते. हे सुभगे सहस्त्रार पद्मात तुझा परम ऐश्वर्य रूपी उदय होतो आणि तो परम सौभाग्य दायिनी, सायुज्य पदवी देणारा आहे. समय मार्गाची साधना म्हणजेच सहस्त्रारात भगवतीच्या परम तत्व रूपाच्या उपासनेचे फळ सायुज्य मुक्ति आहे.

**[५२]**

***अतोऽस्याः संसिद्धौ सुभगसुभगाख्या गुरुकृपा-** पाठभेद - अतस्ते संसिद्धा
**कटाक्षव्यासङ्गात्स्रवदमृतनिष्यन्दसुलभा ।**
**तया विद्धो योगी विचरति निशायामपि दिवा**
***दिवा भानू रात्रौ विधुरिव *कृतार्थीकृतमतिः ॥ ५२॥** पाठभेद - दिवा वा रात्रौ वा, कृतार्थीकृत इति

**अर्थ:-** या समय मार्गाची सिद्धि झाल्यावर आणि गुरुच्या कृपा कटाक्षाने परम सौभाग्यप्रद सुभगा नामक कुंडलिनी शक्तिचे जागरण झाल्यावर आणि गुरूच्या सान्निध्यात राहून साधक जेव्हा गुरूला प्रसन्न करून त्यांच्याकडून समय मार्गाचे रहस्य जाणतो आणि महावेध दीक्षा प्राप्त करतो तेव्हा त्याला अमृत स्त्रावाचे पान आणि रसास्वादन करता येते आणि अश्या प्रकारे विद्ध योगी कृतार्थतेने रात्रीत दिवसाप्रमाणे , दिवसा सूर्याप्रमाणे आणि रात्री चंद्राप्रमाणे विहार करतो आणि अश्या तऱ्हेने सिद्धि-प्राप्त समयाचारी योग्याला देश , काल , आणि परिस्थिति विचलित करू शकत नाही. तो सतत गीतेत सांगितल्याप्रमाणे “ समधी “ होऊन रहातो. सूर्य आणि चंद्राप्रमाणे अबाध गतीने पृथ्वीतलावर स्वच्छंद होऊन फिरतो आणि सगळ्यांना कृतार्थ करतो.

**।। अलम –शुभम ॥**

अश्या रीतीने श्री गुरुकृपेने ही सौभाग्योदय नामक टीका संपूर्ण झाली.